॥ श्रीहरिः ॥

# विषय-सूची

| | विषय | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|
|  |

|| श्रीहरि: ||

# गोविंद

एक फार सुंदर गाव आहे गोवर्धन. या गावामध्ये ब्राह्मणांची, क्षत्रियांची व वैश्यांचीच घरे अधिक आहेत. गावाच्या मध्यभागी एक देऊळ आहे. त्यात भगवान श्रीनाथजींची अत्यंत विलोभनीय मूर्ती विराजमान आहे. त्या मूर्तीची शोभा ती काय वर्णावी ? चरणी नूपुर, कंठी वनमाळा व मस्तकावर मनोहर मोर-मुकुट. मस्तकावर कुरळे केस व कटीवर पीतांबर शोभतो आहे. अशा या मूर्तीचे सौंदर्य कितीही न्याहळले, तरी मन तृप्तच होत नाही.

देवळाजवळच एका गरीब ब्राह्मणाचे घर होते. तो ब्राह्मण गरीब असला तरीही त्याचे हृदय भक्तीने ओतप्रोत भरलेले होते. त्याची पत्नीपण आपल्या पतीच्या पावलावर पाऊल टाकत परमेश्वराच्या भक्तीमध्ये लीन होती. तिचा स्वभाव फार सरळ आणि मनमिळावू होता. कठोर शब्द कधी तिच्या तोंडून बाहेर पडले नाहीत. या ब्राह्मण दंपतीस एक सुपुत्र होता. आपल्या माता-पित्यांप्रमाणेच त्याचाही स्वभाव फार सरळ व सुंदर होता. दहा वर्षे वयाच्या या बालकाचे नाव होते गोविंद. त्याचे सौंदर्य पाहून तर लोक त्याला अगदी 'मदनाचा पुतळा' म्हणत.

गोविंद आपले मित्र सदानंद व रामदास यांच्या सोबत गावाबाहेरील मैदानात खेळत असे. एके दिवशी ही मंडळी खेळत असताना फार उशीर झाला. संध्याकाळ झाली. गोविंद घरी येत असताना त्याच्या कानावर मंदिरातील आरतीचे स्वर पडले. आरती होत असताना टाळ, चिपळ्या, शंख, नगारे वाजत होते. त्यांचा आवाज ऐकू आल्याने, "हा काय प्रकार आहे" हे पाहण्यासाठी तो त्याचक्षणी पळत पळत श्रीनाथजींच्या देवळामध्ये गेला.

त्याने श्रीनाथजींचे दर्शन घेतले. त्याचे सर्व लक्ष त्या मूर्तीमध्येच एकवटले. ती एक पाषाणमूर्ती आहे, याचे त्याला भान राहिले नाही. त्याला वाटले की, आपल्यासारखाच सजीव असा एक मुलगा त्या ठिकाणी उभा राहून हसतो आहे. गोविंद त्या मूर्तीच्या मंद स्मितावर मोहित झाला. त्याला वाटले. ''हा मुलगा माझा मित्र बनून माझ्याबरोबर खेळावयास आला, तर किती छान होईल.'' इतक्यात ती आरती संपली. लोक आपआपल्या घरी गेले. देवळाचे दरवाजे बंद करून पुजारीसुद्धा घरी निघून गेले. गोविंद एकटाच तेवढा राहिला, तो देवळाच्या बाहेर अंधारातच उभा होता श्रीनाथजींची वाट बघत. सर्वजण निघून गेल्याची खात्री झाल्यावर गोविंद देवळाच्या दरवाजाजवळ गेला. एका छिद्रातून त्याने आत डोकावून पाहिले. श्रीनाथजींची मूर्ती शांतपणे एकटीच उभी होती, मूर्तीकडे प्रेमपूर्वक पाहून गोविंदाने अगदी मनापासून देवाचा धावा केला आणि म्हणाला, ''दादा ! तू माझ्यासोबत खेळायला येणार ना? तुझ्यासोबत खेळ खेळण्यासाठी मी फार आतुर झालो आहे. दादा, चल ना! बघ, बाहेर चांदणं आहे. आपण विटी-दांडू खेळू या. मी खरं सांगतो, मी भांडणार नाही, मारामारी करणार नाही. मग तर झालं.''

अत्यंत सरळ आणि निरागस मनाच्या ह्या बालकावर आरतीच्या वेळेला जे भक्तीचे संस्कार झाले होते, त्याने तो वेडावून गेला. परमात्म्याच्या अमृतमयी अनन्य भक्तीच्या चंदनगंधित वायूचा त्याला स्पर्श झाल्याने तो प्रेममग्न होऊन त्या भक्तप्राणधन भगवंतास मोठमोठ्याने बोलावू लागला. त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. त्याच्या या आसवांनी गदगदलेल्या शब्दांचा योग्य तो परिणाम झाला. **ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्** (गीता-४.११) या आपल्या गीतेमधील प्रतिज्ञेप्रमाणे भगवंत मंदिरामध्ये थांबू शकले नाहीत. भक्ताच्या प्रेमाने भगवंताला खेचून आणले. गोविंदाला जणू आतून आवाज आला, ''आलो रे बाबा ! आपण दोघं खेळ खेळू बरं का !''

सरळ, निरागस, बालकांच्या मधुर भक्तीने भगवंत आपोआपच

ओढले जातात, धाऊन येतात. ध्रुव बाळासाठी भगवंतास आपल्या चतुर्भुज वेषात वनामध्ये प्रकट व्हावे लागले. प्रल्हादासाठी नरसिंहाचा अवतार घ्यावा लागला. गोकुळाच्या ग्वालबालकांसमवेत भगवंत रानोमाळ गायी चारत फिरले. आणि आज ह्या गोविंदाच्या प्रेमार्त हाकेला प्रतिसाद देण्यासाठी, त्याच्यासोबत खेळ खेळण्यासाठी मंदिराबाहेर त्यांनी धाव घेतली. त्यांच्या मायातत्त्वाचे खेळ कोणाला बरे कळतील ? त्याचे मर्म कोणी जाणू शकेल का ? सर्वसाधारण खेळ करणाऱ्यांच्या जादूला लोक भुलतात; मग हा तर सर्वांचा किमयागार ! माया बिचारी यांच्या चरणांची दासी. म्हणून प्रभूंच्या लीलेचे रहस्य कोणालाही समजणे शक्य नाही. एक मात्र खरे की, प्रभूला आपल्या भक्तांबरोबर खेळणे फार आवडते. म्हणूनच की काय धन्नासोबत गाईच्या धारा काढत फिरणारे भगवंत आज आपल्या भक्त गोविंदाबरोबर खेळ खेळण्यासाठी तयार झाले.

श्रीनाथजी स्मित हास्य करत मंदिराबाहेर येऊन गोविंदाजवळ उभे राहिले. गोविंदाने त्यांचा हात अत्यंत प्रेमाने पकडला. आज गोविंदाच्या आनंदाला पारावार राहिला नाही. एकदा त्याची नजर श्रीनाथजींच्या श्रीमुखाकडे लागलेली असे, तर त्यांच्या करकमलांच्या स्पर्शाने त्याला आत्यंतिक आनंदाचा अनुभव होत होता. गोविंद कधी त्यांच्या डोळ्यांकडे टक लावून पाहात होता; तर कधी त्यांच्या सुरेल शब्दांना-स्वरांना ऐकण्यासाठी आतुर झाला होता. आनंद त्याच्या हृदयात मावत नव्हता. गोष्ट होतीच तशी. ह्या समस्त विश्वाचे सौंदर्य ज्याच्या सौंदर्यराशीसमोर केवळ तुच्छ होते, त्या अनंत असीम रूपराशीची प्रत्यक्ष प्राप्ती झाल्यावर कोण मुग्ध होणार नाही !

ह्या नव्या मित्राला घेऊन गोविंद गावाबाहेर आला. चंद्राचे चांदणे सर्वत्र पसरले होते. सरोवरांमधून प्रियकराच्या प्राप्तीने कुमुदिनी प्रफुल्लित झाली होती. अर्धविकसित कळ्यांचा सुगंध सर्वत्र वातावरणामध्ये दरवळत होता. निसर्ग जणू आपल्या निर्मात्यास भक्तिसुमने वाहण्यासाठी आधीच सज्ज झाला होता. 'श्रीनाथजी आपलेसे झालेले असून ते आपल्याबरोबर

खेळायला आले आहेत', ह्या एकाच कारणाने गोविंद जणू सर्व काही विसरला. तो आपल्या आईबाबांनाही विसरला. दोघे मित्र अत्यंत प्रेमाने वेगवेगळे खेळ खेळू लागले.

गोविंदाने 'बाळकृष्णाला' असे वचन दिले होते की, मी तक्रार किंवा मारामारी वगैरे करणार नाही. पण विविध लीला करण्याची आवड असणाऱ्या श्रीनाथजींच्या मायेने मोहित झाल्यामुळे गोविंद दिलेले वचन विसरला. खेळण्याता काहीतरी कारणामुळे दोन्ही मित्रांमध्ये भांडण झाले. गोविंदाला राग अनावर झाला आणि त्याने एक जोरदार थप्पड बाळकृष्णाच्या श्रीमुखात भडकावली. तो म्हणाला, "पुन्हा मला असं कधी चिडवलं, तर याद राख ! मारमारून तुझी पाठ लाल करीन".

ज्यांच्या सामर्थ्यामुळेच हे सूर्य-चंद्र, वरुण, वायुदेव कार्यरत आहेत, ज्यांच्या प्रभावामुळे देवराज इंद्र वृष्टी करण्यास बाध्य आहेत आणि ज्याच्या नावाने सर्वजण चळचळ कापतात, तसेच यमराजदेखील ज्यांच्या भयाने पापी आणि दुष्टांना शासन करतात, असे त्रिभुवनाधिपती ह्या बालकाच्या हातची चापट खाऊनही काहीही म्हणाले नाहीत. धन्य आहे!

बाळकृष्ण रडू लागला, "गोविंद ! तू तर म्हणाला होतास की, भांडण करणार नाही आणि आता तर चक्क मारलंस मला !"

बाळकृष्णाचे हे म्हणणे ऐकून आणि त्याला रडताना पाहून गोविंदाचे मन भरून आले. पळत जाऊन त्याने बाळकृष्णाचे अश्रू पुसले. त्याला मिठी मारली आणि म्हणाला, "तू रडू नकोस. तुला रडताना पाहिलं की, मला फार वाईट वाटतं."

आणि मग दोघे पुन्हा खेळू लागले. आता रात्र बरीच झालेली असल्याने श्रीनाथजींनी असा विचार केला की, आता गोविंद घरी गेला नाही, तर त्याचे माता-पिता काळजी करतील. आपल्या मायेच्या साह्याने त्यांनी गोविंदाच्या मनामध्ये घरी जाण्याची इच्छा उत्पन्न केली. गोविंद बाळकृष्णाला म्हणाला, "कृष्णा, बराच उशीर झाला आहे. आता मी घरी जातो. आपण उद्या खेळू या."

श्रीनाथजींनी परवानगी दिली. गोविंद घरी गेला. अनाथांचे नाथ श्रीनाथजी आपल्या मंदिरात निघून गेले.

मग रोजच अशा प्रकारे खेळ होऊ लागला. गोविंद ह्या आपल्या मनमोहक नवीन मित्रामुळे जुन्या मित्रांनाही विसरला. एके दिवशी काय झाले की, श्रीनाथजींनी गोविंदाला डावच दिला नाही. उलट ते पळून गेले. गोविंद त्यांच्यामागे धावला. श्रीनाथजी धावत पळत आपल्या मंदिरात जाऊन बसले. देवळाचे दरवाजे बंद असल्यामुळे गोविंदाला आत जाता आले नाही. हा अन्याय आहे, असे समजून गोविंद देवळाबाहेर उभा राहून श्रीनाथजींच्या नावाने मोठमोठ्याने बोलू लागला. भक्तमालेचे रचनाकार महान भक्त श्री रीवाँनरेश रघुराज सिंहजी यांनी ह्या प्रसंगाचे वर्णन खालील शब्दात केले आहे. ते म्हणतात -

**भगि मंदिर भीतर कृष्ण गये, तब गोबिंद भीतर जान लगो।**
**जब पंडन मारि निकासि दियो, तब बाहर ही अति कोप जगो॥**
**महि ठोंकत डंड, प्रचारत गारि दे, तू कढ़िहैं कबलों न भगो।**
**इत बैठे रहौंगो मैं तेरे लिए, नहि दाँव दियो अहै पूरो ठगो॥**

गोविंद तक्रार करत म्हणतो, ''माझ्याकडून तर डाव घेतलास आणि आपली पाळी आली की देवळात जाऊन लपून बसलास ?'' हीच तक्रार तो बाहेर करू लागला, तेव्हा पुजाऱ्यांनी त्याला हाकलून लावले. तर गोविंद श्रीनाथजींच्या बाबत असा प्रचार करू लागला की, बघा, माझा डाव देत नाही ते नाही आणि आपल्या पुजाऱ्यांकडून मला मार देववला. आता मी मंदिराबाहेरच बसून राहणार आणि डाव घेतल्याशिवाय जाणारच नाही.''

आणि तसेच झाले. मंदिर उघडताच गोविंद आत घुसला. त्याच्या हातात खेळण्यातला दांडू होता. त्याने त्या मूर्तीला एकदम मारायला सुरवात केली. तो मूर्तीला बडवत असताना मोठमोठ्याने म्हणत होता,

''जाशील का पळून ? पुन्हा कधी असं करशील का ? माझा डाव चुकवशील का ? बोल, बोल ! आता कसा गप्प झालास ते !''

सर्व पुजारी आधी तर भांबावले. मग भानावर येताच क्रोधाने लाल झाले. त्यांनी गोविंदाला मारले आणि पकडून देवळाबाहेर हाकलून दिले. अशाने त्याच्या भक्तीची, प्रेमाची तीव्रता वाढली आणि तो मोठमोठ्याने म्हणू लागला, ''नाथजी ! हा अन्याय आहे. माझा डाव न देता पळून आलास आणि आपल्या माणसांना सांगून मार बसवला. मला हाकलून लावले. ठीक आहे, जोपर्यंत मी ह्या सगळ्याचा बदला घेत नाही, तोपर्यंत मी तोंडात पाणीही घेणार नाही.''

झाले. इतके म्हणून नाराज झालेला गोविंद निघून गेला. तो गोविंदकुंडावर जाऊन बसला. इकडे देवळामध्ये नैवेद्य तयार झाला. पुजाऱ्यांनी उपचारपूर्वक नैवैद्य दाखवला. पण श्रीनाथजी तो स्वीकारीनात. आणि कसे स्वीकारतील बरे त्यांचा तो निरागस भक्त उपाशी असताना ? त्यांनी पुजाऱ्यांना दृष्टांत देऊन आदेश दिला, ''तुम्ही ज्याला बडवून बाहेर घालवून दिले आहे, तो तर माझा लाडका भक्त आहे. तो जोपर्यंत येत नाही, तोपर्यंत मी नैवेद्य स्वीकारणार नाही. त्याच्या अंगावर पडलेल्या माराचे वळ माझ्या अंगावर उमटले आहेत''.

भक्त आणि भगवंताचे असेच असते. भक्त आणि भक्तवत्सल भगवंत अभिन्न असतात, हे पुजाऱ्यांना कुठे माहीत ? ते सगळे आश्चर्यचकित होऊन त्या गोविंदाला शोधण्यासाठी सगळीकडे धावले. शेवटी तो गोविंदकुंडावर त्यांना दिसला. ते म्हणू लागले, ''बाबा रे ! तू आमच्याबरोबर चल. श्रीनाथजींनी तुझ्याबरोबर आपला डाव हरल्याची कबुली दिली आहे. ते तुझ्याबरोबर पुन्हा खेळायला तयार आहेत. आता तू लवकर चल.''

त्यांचे म्हणणे ऐकल्यावर इतका वेळ रुसून बसलेला गोविंद बालसुलभ हसला आणि म्हणाला, ''मी येणारच नव्हतो. तोच माझ्याजवळ आला असता आणि मी त्याला बदडून काढलं असतं, तेव्हाच तो सरळ झाला

असता. पण आता त्यानं स्वत: होऊन जर हार स्वीकारली आहे तर ठीक आहे. मी यायला तयार आहे.''

असे म्हणून तो देवळात गेला आणि विजयाच्या आनंदाने म्हणाला, ''कसं काय श्रीनाथजी ? पुन्हा करणार का अशी हुशारी माझ्याबरोबर? बरं झालं, तुम्हीच हार मानली. नाही तर असा धडा शिकवला असता की, आयुष्यभर आठवण राहिली असती.''

गोविंद असे म्हणाला खरे; पण जेव्हा त्याने श्रीनाथजींच्या मुखाकडे पाहिले, तेव्हा त्याला असे वाटले की, श्रीनाथजी उदास आहेत. साध्या सरळ हृदयाच्या गोविंदाला हे पाहून फार वेदना झाल्या तो म्हणाला, ''दादा ! आतापर्यंत तू नैवेद्य का नाही घेतलास? तुझ्या उदास चेहऱ्याकडे मी पाहू शकत नाही. मी पुन्हा कधीच तुला मारणार नाही. मी आता रुसणार नाही. आता राग सोडून आधी अन्न ग्रहण कर बरं !''

देवळाचे दरवाजे एकदम बंद झाले. आणि श्रीनाथजी स्वत: प्रकट होऊन म्हणाले, ''गोविंदा, तूसुद्धा उपाशी आहेस की. ये, आपण दोघेही मिळून भोजन घेऊ या.''

श्रीनाथजींचे मुखकमल पाहून गोविंदाचा चेहरा आनंदाने उजळून निघाला. आनंदातिशयाने दोघेही हसू लागले. निखळ आनंदाच्या स्वरांनी मंदिराचा गाभारा भरून गेला. तो गोविंद या गोविंदाचा दास झाला. अकस्मात सर्व दरवाजे उघडले गेले. गोविंदाला दिव्य चक्षू प्राप्त झाले आणि त्याला सर्वत्र केवळ श्रीनाथजींचे दर्शन होऊ लागले. अशा भगवंत आणि भक्ताचा त्रिवार जयजयकार असो !!

❑❑

# मोहन

एका छोट्याशा गावात एक विधवा ब्राह्मणबाई राहत होती. ती अत्यंत गरीब होती. तिला तिच्या एकुलत्या एका मुलाशिवाय कुणीच नव्हते. बाईला दोन-चार चांगल्या घरातून भिक्षा मागून जे काही मिळे त्यातून ती स्वत:चा आणि आपला मुलगा मोहन दोघांचा उदर-निर्वाह चालवीत असे. एखाद्या दिवशी फारच कमी भिक्षा मिळाली, तर ती स्वत: उपाशी राही आणि मुलाला खाऊ-पिऊ घालून त्याला हृदयाशी कवटाळून संतुष्ट मनाने झोपी जाई. गावात असे लोक पण होते, ज्यांची स्थिती खूपच चांगली होती. परंतु गरीब असाह्य विधवेची त्यांना पर्वा नव्हती. मोठमोठ्या महालांतून राहणाऱ्या श्रीमंत लोकांना चांगले-वाईट वाटेल तितके पोटात कोंबत राहिल्याने मंदाग्नीचा रोग जडावतो. त्यांना खाल्लेले पचत नाही. तरी पण त्यांना गरिबांच्या हलाखीच्या स्थितीकडे लक्ष द्यावे असे वाटत नाही. देशात कुणास ठाऊक कितीतरी गरीब लोक भुकेच्या ज्वालांनी होरपळून तडफडून मरून जातात. त्यांच्याकडे कोण लक्ष देतो ? पण ज्याचे कुणी नसते, त्याचा देव असतो. तो विश्वंभर मोडक्या झोपडीतसुद्धा गरिबाचे पोट भरण्यासाठी चार दाणे अवश्य पाठवून देतो.

विधवेचा मुलगा सहा वर्षांचा झाला. ब्राह्मणाचा मुलगा आहे. काहीतरी शिकले पाहिजे. पण कसे शिकणार ? गावच्या लोकांच्या दृष्टीने तर ब्राह्मणी दरिद्री म्हणून घृणास्पद. म्हणून मग विधवेने दुसऱ्या जवळच्या गावात मुलाला शाळेत घातले. तिथल्या गुरुजींच्याकडे ती आपल्या मुलाला घेऊन गेली आणि तिने डोळ्यात आसवे आणून त्यांचे पाय धरले. गुरुजींना तिची दया आली. त्यांनी मुलाला शिकवायचे कबूल केले. मोहन शाळेला जाऊ लागला. त्याच्या गावापासून शाळेचे गाव दोन कोसांवर होते. पण दरिद्री विधवेच्या मुलाला जायला यायला वाहन कुठून मिळणार?

मोहन पायीच शाळेला जात असे. त्याकाळी गुरूच्या घरी मुलांनी राहण्याची प्रथा होती. परंतु मोहन फारच लहान असल्यामुळे त्याला एकट्याला गुरुगृही राहायची इच्छा नव्हती आणि आईलाही रात्री आपल्या एकुलत्या मुलाला पदराखाली घेऊन झोपल्याशिवाय चैन पडत नसे. शाळेच्या वाटेवर मध्येच थोडेसे निर्मनुष्य जंगल होते. मोहनला त्या जंगलातूनच जावे लागे. सकाळी सूर्योदयालाच तो निघे आणि संध्याकाळी परतता-परतता अंधार पसरे. त्यामुळे मोहनला जंगलात फार भीती वाटे.

एके दिवशी गुरुजींच्या घरी काही तरी उत्सव होता. त्यामुळे मोहनला परतायला थोडा उशीर झाला. कृष्णपक्ष असल्याने जंगलात अंधार दाटला होता. मोहन वाटेत खूप भ्याला. जंगली जनावरांचा आवाज आणि कोल्हेकुई ऐकून तो थरथर कापू लागला. विधवा बाई पण मुलगा अजून कसा आला नाही, हे पाह्यला निघाली. वाटेत भीतीने थरथर कापणाऱ्या लेकराला कडेवर घेऊन ती घरी परतली. मोहन थोडा शांत झाल्यावर आईला म्हणाला, ''आई ! मी रोज जंगलातूनच येतो-जातो. मला तिथे फार भीती वाटते. आज तू जर आली नसतीस, तर माझे काय झाले असते कुणास ठाऊक ! दुसऱ्या मुलांच्या बरोबर तर त्यांचे नोकर असतात. ते त्यांना सांभाळतात. माझ्यासाठी एखादा नोकर का नाही ठेवत ?''

मुलाचे सरळ बोलणे ऐकून तिला आपल्या गरीब परिस्थितीची जाणीव झाली आणि तिचे डोळे भरून आले. आईने खूप संयम ठेवायचा प्रयत्न केला परंतु तिच्या धैर्याचा बांध फुटला. ती रडत रडत म्हणाली, ''बाळ ! माझ्या दुःखाची कहाणी तुला कशी सांगू ? आपण फारच गरीब माणसे आहोत. तुझ्यासाठी नोकर ठेवायला माझ्याकडे पैसे कुठे आहेत?'' आईला रडताना पाहून मोहन पण रडू लागला. तो म्हणाला, ''आई! तू का रडतेस ? तुला रडताना पाहून मला पण रडू येते. आई ! आपल्याला कुणीच नाही का ग ?'' मोहनच्या सरळ पण मर्मभेदी प्रश्नाने आईचे हृदय कळवळून गेले. तिच्या पायाखालची जमीनच जणू

सरकू लागली. तिचे धैर्य संपू लागले. पण त्याचवेळी तिच्या मनात विचार आला की, परमेश्वराला तर अनाथांचा नाथ म्हणतात. तो नाही का आपला ? हा विचार मनात येताच आईच्या अंत:करणाला बळ मिळाले. तिचे अश्रू अचानक संपले. ती म्हणू लागली, ''पोरा ! नाही कसे? आपला गोपाळ आहे ना ?'' मुलाने विचारले, ''आई, गोपाळ माझा कोण?'' प्रेमळ आईच्या तोंडून निघाले, ''गोपाळ तुझा थोरला भाऊ ! तुझा दादा !'' मुलाने विचारले, ''आई ! तो कुठे राहतो ? मी तर त्याला कधीच पाह्यले नाही !'' आईचे अंत:करण भगवत्-प्रेमाने भरून गेले होते. जेव्हा मनुष्य सगळी कडून पूर्णपणे निराश होऊन ईश्वरावर भरवसा धरून त्याच्याकडेच निरालंब होऊन पाहू लागतो, तेव्हा त्याला ताबडतोब तिकडून आश्वासन आणि आसरा मिळतो. त्या अव्यक्त आश्रयाला प्राप्त करताच हृदयात बळ, बुद्धी, तेज आणि ज्ञानाचा विकास आपोआप होऊ लागतो. भगवत्-प्रेमाने अंत:करण भरून जाते. आई ठामपणाने बोलू लागली, ''बाळा ! माझा तो गोपाळ सर्वत्र आहे. जळी-स्थळी, अनल-अनिल, आकाश-पाताळ, फळ-फूल, समुद्र-सरिता, सगळ्या ठायी तो आहे. जगात कोणतीच जागा नाही की, जिथे तो नाही. पण तो सहजा-सहजी दिसत नाही. जेव्हा कुणी त्याला पाहण्यासाठी खूपच व्याकुळ होतो, तेव्हाच त्याला तो दिसतो. एकदा वृंदावनातील गवळणी खूप व्याकूळ झाल्या, त्यांना तो दिसला होता. एकदा पाच वर्षांच्या ध्रुव बाळाला तो दिसला होता. जो एकदा त्याला पाहतो, तो त्याचे सौंदर्य आणि औदार्यावर कायमचा मोहित होतो.''

**मोहन** – आई, आपला गोपाळ दादा आपल्या घरी कधी येत नाही ?

**आई** – येत कसा नाही ? तो तर इथेच राहतो नेहमी.

**मोहन** – तू त्याला पाह्यलंस कधी ?

**आई** – पाह्यलं तर नाही ! मी त्याच्यासाठी कधी व्याकुळच झाले नाही. पण मला माहीत आहे की व्याकूळ झाल्यावर तो नक्की दर्शन देतो.

**मोहन** – मग तू व्याकूळ का होत नाहीस ? अशा सुंदर रूप आणि सुंदर स्वभावाच्या दादाला न पाहता तुला राहवतंच कसं ? आई, मी तर त्याला न पाहता राहणारच नाही. मला सांग, मी त्याच्यासाठी व्याकूळ कसा होऊ ?

**आई** – बाळा ! भूक लागल्यावर तू कसा व्याकूळ होतोस ? तहान लागल्यावर तू कसा ओरडतोस ? किंवा आज जंगलात तू माझ्यासाठी कसा घाबरला होतास ? तसे व्याकूळ होऊन जर तू त्याला हाक मारलीस, तर तो आल्याशिवाय राहणार नाही. त्या दिवशी मी तुला एक गोष्ट सांगितली होती ना ? विसरलास का ? पांडवांची पत्नी द्रौपदीला जेव्हा दुष्ट दु:शासन भर सभेत विवस्त्र करू लागला, तेव्हा व्याकूळ होऊन तिने हाक मारली होती. तिची हाक ऐकताच माझा गोपाळ धाऊन तिथे गेला.

**मोहन** – म्हणजे तोच गोपाळ माझा भाऊ आहे का ?

**आई** – हो रे माझ्या बाळा ! तोच तो ! हाक मारताच तो येतो आणि सगळ्या संकटातून सोडवतो.

**मोहन** – तर मग आई ! मी काय करू ? कशी हाक मारू ? आई पूर्ण विश्वासाने म्हणाली, ''ऐक ! तू ज्या जंगलातून जातोस, त्याच जंगलात तुझा गोपाळ दादा राहतो. त्याला मनापासून हाक मार. तुझी व्याकूळ होऊन मारलेली हाक ऐकताच तो धावत तुझ्या सोबतीला येईल.''

दुसऱ्याच दिवशी आईने सांगितलेल्या गोष्टीवर सरळ मनाने विश्वास ठेवणाऱ्या मोहनने जंगलात प्रवेश करताच इकडे तिकडे पाहिले आणि ओरडून म्हणाला, ''दादा, दादा ! गोपाळदादा ! तू कुठे आहेस? मला भीती वाटते. तू लवकर ये.'' मोहनला वाटले, कुणीतरी म्हणतंय की, ''होय मी इथेच आहे. आलोच.'' गोड आवाज ऐकताच मोहनला धैर्य

**आई** – पाह्यलं तर नाही ! मी त्याच्यासाठी कधी व्याकुळच झाले नाही. पण मला माहीत आहे की व्याकूळ झाल्यावर तो नक्की दर्शन देतो.

**मोहन** – मग तू व्याकूळ का होत नाहीस ? अशा सुंदर रूप आणि सुंदर स्वभावाच्या दादाला न पाहता तुला राहवतंच कसं ? आई, मी तर त्याला न पाहता राहणारच नाही. मला सांग, मी त्याच्यासाठी व्याकूळ कसा होऊ ?

**आई** – बाळा ! भूक लागल्यावर तू कसा व्याकूळ होतोस ? तहान लागल्यावर तू कसा ओरडतोस ? किंवा आज जंगलात तू माझ्यासाठी कसा घाबरला होतास ? तसे व्याकूळ होऊन जर तू त्याला हाक मारलीस, तर तो आल्याशिवाय राहणार नाही. त्या दिवशी मी तुला एक गोष्ट सांगितली होती ना ? विसरलास का ? पांडवांची पत्नी द्रौपदीला जेव्हा दुष्ट दुःशासन भर सभेत विवस्त्र करू लागला, तेव्हा व्याकूळ होऊन तिने हाक मारली होती. तिची हाक ऐकताच माझा गोपाळ धाऊन तिथे गेला.

**मोहन** – म्हणजे तोच गोपाळ माझा भाऊ आहे का ?

**आई** – हो रे माझ्या बाळा ! तोच तो ! हाक मारताच तो येतो आणि सगळ्या संकटातून सोडवतो.

**मोहन** – तर मग आई ! मी काय करू ? कशी हाक मारू ? आई पूर्ण विश्वासाने म्हणाली, ''ऐक ! तू ज्या जंगलातून जातोस, त्याच जंगलात तुझा गोपाळ दादा राहतो. त्याला मनापासून हाक मार. तुझी व्याकूळ होऊन मारलेली हाक ऐकताच तो धावत तुझ्या सोबतीला येईल.''

दुसऱ्याच दिवशी आईने सांगितलेल्या गोष्टीवर सरळ मनाने विश्वास ठेवणाऱ्या मोहनने जंगलात प्रवेश करताच इकडे तिकडे पाहिले आणि ओरडून म्हणाला, ''दादा, दादा ! गोपाळदादा ! तू कुठे आहेस? मला भीती वाटते. तू लवकर ये.'' मोहनला वाटले, कुणीतरी म्हणतंय की, ''होय मी इथेच आहे. आलोच.'' गोड आवाज ऐकताच मोहनला धैर्य

आले. त्याची भीती पार पळून गेली. थोडेसे पुढे गेल्यावर त्याने पाहिले की, त्याच्याच एवढा एक लहान नयन-मनोहर, सुकुमार, श्यामसुंदर असा गवळ्याचा पोर वनातल्या झाडीतून बाहेर येऊन त्याच्याशी खेळू लागला. प्रेमाने बोलू लागला आणि मोहनचा हात धरून त्याच्यासोबत चालू लागला. गोपाळ येताच मोहनचे सारे दुःख संपले. घरी आल्यावर मोहनने आईला सगळी हकीकत सांगितली. ब्राह्मण-स्त्रीच्या लक्षात भगवंताची दया आली आणि तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. तिने विचार केला की, ''ज्या दयाळू देवाने ध्रुव बाळाची आर्त हाक ऐकून त्याला दर्शन दिले, तोच माझ्या बाळाने हाक मारल्यावर आला, तर त्यात आश्चर्य कसले ?''

काही दिवसांनंतर मोहनच्या गुरुजींच्या वडिलांचे देहावसान झाले. त्यांच्या श्राद्धाचे आयोजन करण्यात आले. श्राद्धासाठी सर्व विद्यार्थी गुरुजींना काही ना काही भेट वस्तू आणून देणार. मोहनने सरळ मनाने गुरुजींना विचारले, ''मी काय आणू गुरुजी ?'' गुरुजींना ब्राह्मण विधवेची स्थिती माहीत होती. ते म्हणाले, ''बाळा, तू काही नाही आणलेस तरी चालेल.'' मोहन म्हणाला, ''तसं नाही गुरुजी ! जर सर्व मुलं काही ना काही आणणार आहेत, मग मीच काही आणू नये, हे योग्य नाही. आपण आज्ञा द्या मला काही ना काही आणायची.'' मुलाने परत परत आग्रह केल्यावर गुरुजी म्हणाले, ''एक तांब्याभर दूध आण म्हणजे झाले.'' मोहन समाधानाने घरी आला. त्याने आईला सांगितले, ''आई, उद्या गुरुमहाराजांच्या वडिलांचे श्राद्ध आहे. सगळी मुलं काही ना काही सामान घेऊन जाणार आहेत. मला गुरुजींनी फक्त तांब्याभर दूध घेऊन यायला सांगितले आहे. म्हणून तू थोडे दूध विकत आणून दे.'' विधवेचे घर म्हणजे तर दारिद्रयाची खाण ! अश्वत्थाम्याच्या आईला पण एके दिवशी मुलाला समजावण्यासाठी दुधाऐवजी पाण्यात पीठ कालवून काम भागवावे लागले होते. विधवा बाई आपल्या मुलाला म्हणाली, ''बाळा, घरात तर फुटकी कवडी सुद्धा नाही. मग दूध कुठून आणू ? मागून

आणण्यासाठी घरात गडवा तरी कुठे आहे ?'' मोहन रडत म्हणाला, ''आई, मग कसं ग ? मी गुरुजींना तोंड कसं दाखवू ?'' आई दृढ विश्वासाने म्हणाली, ''बाळा ! गोपाळदादाला सांग. तो देईल दूध आणून तुला.'' मोहन खूष झाला. सकाळी गुरुजींच्या घरी जाताना रोजच्या प्रमाणे जंगलात गोपाळदादा त्याला भेटताच तो त्याला म्हणाला, ''दादा, आज आमच्या गुरुजींच्या वडिलांचे श्राद्ध आहे. त्यांनी एक तांब्या दूध आण म्हणून मला सांगितलं आहे. आई म्हणाली, गोपाळदादाला सांग, म्हणजे तो आणून देईल. म्हणून दादा, मला आत्ताच्या आत्ता दूध आणून दे.'' गोपाळ मोठ्या प्रेमाने म्हणाला, ''मोहन, मला आधीच ही गोष्ट माहीत होती. हे पाहा, मी दुधाचा तांब्या भरून बरोबरच घेऊन आलो आहे. तू हा घेऊन जा.'' मोहनने गोपाळदादाकडून दुधाचा तांब्या घेतला. आज त्याच्या आनंदाला पारावार नव्हता. काम झाल्यावर कुणाला आनंद होत नाही ? राज्यपिपासूंना जो आनंद राज्य प्राप्त झाले म्हणजे होतो, तोच आनंद लहान बालकांना मनासारखे मामुली खेळणे मिळाले तरी होतो. खरे तर दोन्ही खेळणीच! वास्तविक आनंद राज्यप्राप्तीतही नाही की, मामुली खेळण्यातही नाही. आनंद तर आपल्या आत कुठेतरी आहे, जो मनोरथ पूर्ण झाल्यावर मनात एखाद्या विजेप्रमाणे तळपतो आणि दुसरे मनोरथ मनात उत्पन्न न होईपर्यंत चकाकत राहतो. पण इथे गोपाळदादाने दिलेल्या दुधाच्या प्राप्तीत तर एक वेगळाच विलक्षण आनंद होतो. या आनंदाचे स्वरूप जो भाग्यवान जाणतो, त्याला भगवंताच्या कृपेने त्याची प्राप्ती होते. आमच्यासारख्यासाठी तर ही कल्पनेच्या बाहेरची गोष्ट आहे.

मोहन हसत हसत दुधाचा लहानसा तांब्या घेऊन गुरुजींच्या जवळ गेला. मुलांनी आणलेले सामान गुरुजींचे नोकर त्यांना दाखवून बाजूल ठेवीत होते. मोहनला वाटले, आपली पाळी येईल. परंतु त्याच्या लहान तांब्याकडे कोणाचेच लक्ष गेले नाही. मोहन उदास होऊन गुरुजींन म्हणाला, ''महाराज ! मी पण दूध आणले आहे.'' गुरुजी आलेल्य

सामानाची व्यवस्था करण्यात गुंतले होते. त्यांनी मोहनच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. गरिबांच्या श्रद्धा आणि प्रेमाने भरलेल्या उपहाराची गोडी तर प्रेमासाठी आसुसलेल्या परमेश्वराला असते. त्याचा सन्मान तेच करू जाणे ? सुदाम्याच्या तांदळाची कणी, अस्पृश्य भिल्लिणीची बोरे, राजस्थानच्या करमाबाईची खिचडी आणि विदुराच्या भाजीच्या गोडीचा अनुभव भगवंतालाच होता. म्हणूनच त्याने प्रसन्न होऊन त्याचा स्वाद घेतला आणि घोषणा केली की,

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन:॥**

(गीता ९/२६)

"माझ्यावर प्रेम करणारे भक्त शुद्ध भावनेने पत्र, पुष्प, फळ, जल आदी जे काही मला अर्पण करतात, त्या प्रेमार्पित पदार्थांचा मी मोठ्या प्रेमाने आस्वाद घेतो."

पदार्थ किती आहेत याचे महत्त्व नाही. महत्त्व आहे ते प्रेमाचे. भगवान श्रीकृष्णांच्या आतिथ्यासाठी कौरवांनी कमी तयारी केली नव्हती. पण भगवान श्रीकृष्ण म्हणाले,

**सम्प्रीतिभोज्यान्यन्नानि आपद्भोज्यानि वा पुन:।**
**न च सम्प्रीयसे राजन् न चैवापद्गता वयम्॥**

(महाभारत)

"भोजन जिथे प्रेम असते तिथे केले जाते अथवा संकटकाली कुठेही केले जाऊ शकते. इथे तुमच्या मनात माझ्याविषयी प्रेम नाही आणि संकट माझ्यावर कोसळलेलं नाही. म्हणून मी तुमच्याकडे भोजन करणार नाही." अस्तु !

जेव्हा मोहन परत परत गुरुजींना आणलेले दूध घेण्याविषयी सांगू लागला, तेव्हा कातावून गुरुजी एका नोकराला म्हणाले, "एवढंसं दूध

काय आणलंय आणि हा मुलगा किती आरडा ओरडा करतोय ! जणू दूध आणून याने आमच्यावर उपकार केले आहेत.'' याचं हे दूध घ्या आणि ही कटकट घालवा बरं इथून !'' अपमानामुळे मोहनच्या चेहऱ्यावर विषाद पसरला. गरीब बिच्चारा काय करणार ? तो रडू लागला.

परमेश्वराची लीला अगाध आहे. तो कोणत्या कारणाने कधी काय करील, कोणालाच पत्ता लागत नाही. नोकराने दूध कटोऱ्यात ओतले. कटोरा भरला, पण तांब्या रिकामा झाला नाही. त्याने एक ग्लास घेतला, तोही भरला. पण तांब्यात दूध जसेच्या तसे ! मग त्याने एका बादलीत दूध ओतले. ती पण भरली. मग घाबरलेला नोकर गुरुजींच्याकडे धावला आणि त्याने सगळा वृत्तान्त त्यांना सांगितला. श्राद्धासाठी बरेच ब्राह्मण गोळा झाले होते. ही आश्चर्यकारक घटना ऐकून सगळे तिकडे धावले. त्यांनी जाऊन पाहिले की, एका लहानश्या तांब्यात दूध भरलेले आहे. जवळच एक बादली आणि बऱ्याच भांड्यात दूध भरलेले आहे. गुरुजी नोकराला म्हणाले, ''माझ्यासमोर ओत बरं !'' नोकराने दुसऱ्या एका मोठ्या भांड्यात तांब्यातले दूध ओतायला सुरवात केली. भांडे भरले पण तांब्या काही रिकामा झाला नाही. मग दुसरे एक त्याहीपेक्षा मोठे भांडे आणून ठेवले. ते पण पाहता पाहता भरले. दूध जणू द्रौपदीचे वस्त्र झाल्यासारखे वाढतच चालले.

**डारत डारत कर थक्यो, चुक्यो न लुटिया-दूध।**

''ओतता ओतता हात थकून गेले पण तांब्यातले दूध काही संपेना!'

मग मात्र गुरुजी आणि ब्राह्मण मंडळींच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. गुरूने मोहनला विचारले, '' बाळा ! तू हे दूध कोठून आणलेस?' मोहन सरळपणाने म्हणाला, ''माझा गोपाळ दादा वनात राहतो. त्यानेच मला दिले.'' गुरुजींनी विचारले, ''बाळा ! हा गोपाळदादा म्हणजे कोण?'' मोहन म्हणाला, ''माझा भाऊ आहे. माझ्या आईने सांगितले

की, तू त्याला वाटेल ते माग. तो दीनांचा नाथ आहे. पतितांना तो पवित्र करतो. दु:खीजनांना तो कवटाळतो. निराधारांचा तो आधार आहे आणि व्यकूळ होऊन त्याला हाक मारताच तो धावत येतो. जे पाहिजे ते देतो.''

मोहनचे बोलणे ऐकून गुरुजी सद्‌गदित झाले. गुरुजींनी त्याला आपल्या हृदयाशी धरले. थोड्या वेळापूर्वी जो घृणास्पद वाटत होता, तोच आता आदरास पात्र ठरला ! गोपाळ ज्याला आपलेसे करतो, त्याला कोण आपले म्हणणार नाही ? जे उलटे असतात, तेही सरळ होतात. विषसुद्धा अमृत बनते.

**गरल सुधा रिपु करहिं मिताई।**
**गोपद सिंधु अनल सितलाई॥**

गोपाळाच्या कृपेने विष अमृत बनते, शत्रू मित्र होतात, सागराचा विस्तार गायीच्या खुराएवढा आणि अग्नी शीतल होतो.

ब्राह्मण मंडळी जेवायला बसली. श्राद्धासाठी गोपाळने आणलेल्या दुधाची खीर केली होती. ती खीर इतकी स्वादिष्ट झाली होती की, ब्राह्मण मंडळी तृप्तच होत नव्हती. खीर अजून खावी असेच सर्वांना वाटत होते. त्या खिरीची रुचीच काही और होती. का नाही असणार? ज्याच्या प्रसादाचा एक कण प्राप्त करण्यासाठी ब्रह्मादी देव नेहमी आतुर आणि व्याकूळ असतात, तोच प्रसाद आज श्राद्धाचे भोजन म्हणून सर्वांना यथेच्छ प्राप्त होता. ब्राह्मण वृंदांचे फक्त मनच नाही भरले तर त्या महाप्रसादामुळे त्यांना सुर-मुनींना दुर्लभ असे पद प्राप्त झाले व त्यांना शाश्वत तृप्ती प्राप्त झाली. ब्राह्मणाचे पितर तरले, त्यात आश्चर्य कसले ?

ब्रह्म-वृंद मोहनला स्नेहार्द्र हृदयाने आशीर्वाद देऊन निघून गेला. शेवटी गुरुजी आपल्या शिष्यांना घेऊन जेवायला बसले. मोहनला पण त्या दिवशी तेथेच भोजन करावे लागले. संध्याकाळ झाली. सगळी मुले आपआपल्या घरी निघून गेली. गुरुजींनी गोपाळदादाच्या लाडक्या मोहनला

थांबवून घेतले होते. सगळे गेल्यावर ते त्याला म्हणाले, ''बाळा! मी पण तुझ्याबरोबर येतो. तुझ्या गोपाळदादाचे दर्शन मला पण नक्की झाले पाहिजे हं !'' मोहन म्हणाला, ''माझ्याबरोबर आत्ताच वनात चला. माझा गोपाळदादा तर हाक मारताच येतो.'' गुरुजींनी बालक मोहनला कडेवर उचलून घेतले आणि दोघे वनात पोचले. मोहनने वनात जाताच हाका मारल्या, ''गोपाळदादा ! ये. आज इतका वेळ का लावतो आहेस ?'' त्याला आवाज ऐकू आला, ''आज तर तू एकटा नाहीस. मग मला कशाला बोलवतोस ?'' मोहन म्हणाला, ''दादा ! माझे गुरुजी तुला पाहू इच्छितात. लवकर ये.'' भक्ताने प्रेमाने मारलेली हाक ऐकून भगवंत थांबूच शकत नाहीत. ताबडतोब, नव-नीरद-नील, श्याम-सुंदर तिथे प्रकटले. मोहन म्हणाला, ''दादा आला, दादा आला! गुरुदेव ! पाहा तरी, माझा गोपाळदादा किती सुंदर आहे !'' गुरुजींना एका विस्मयजनक प्रकाशपुंजाशिवाय काहीच दिसले नाही. ते म्हणाले, ''कुठे? मला तर त्या प्रकाशाशिवाय काहीच दिसत नाही.'' मोहन म्हणाला, ''दादा हे रे काय? तू हा काय खेळ मांडला आहेस ?'' उत्तर मिळालं, ''मोहन मी तुझ्यासाठी येतो, तुझे अंत:करण शुद्ध आहे. त्यात प्रेम भरलेलं आहे. तुझ्या साधनेचा अवधी संपला आहे. पण तुझे गुरुजी दर्शनास पात्र झाले नाहीत. त्यांनी जो प्रकाश पाहिला, तितकाच त्यांच्यासाठी पुरेसा आहे. एवढ्यानेच ते आपल्या कल्याणाच्या मार्गावर वाटचाल करू शकतात.'' हा वीणेपेक्षा गोड आवाज गुरुजींनी पण ऐकला. त्यांच्या हृदयाची बंद दारे उघडली. हृदयात दाटलेला मायेचा बंधारा फुटला. प्रेमाचा सागर उसळला. गुरुजी गद्गद् स्वरात म्हणाले, ''भगवंता ! तुझ्या दिव्य प्रकाशाने माझ्या अंत:करणातील घोर अंधकाराचा नाश केला आहे. तुझ्या दिव्य-वाणीने मला तुझ्या दिव्य-धामाचे दर्शन घडविले आहे. आता मी तुला माझ्या अंत:करणात पाहू शकतो. प्रभो ! माझी हीच इच्छा आहे की, माझी ही स्थिती अशीच टिकून राहो !'' मोहन महान आनंदाने तृप्त होऊन हसत उभा होता.

थोड्याच वेळाने गुरुजींच्यावर पण ईश्वराची कृपा झाली. करुणावरुणालय, सौंदर्याची रास, प्रेमाचे भांडार, उदार चूडामणी, अनुप-रूप-शिरोमणींचे प्रत्यक्ष दर्शन करून गुरुजी कायमचे कृतकृत्य झाले.

मोहनला घेऊन गुरुजी विधवा ब्राह्मणीच्या घरी आले. त्यांनी पाहिले की, तिथे ही गोपाळदादा आईच्या कुशीत विसावून जणू मातेच्या स्नेहामृताचे पान करतो आहे. आईला ब्रह्मज्ञान नाही. तिच्या आनंदाश्रूंच्या अजस्त्र धारेने गोपाळदादाच्या शरीरावर अभिषेक होतो आहे. गुरू आणि शिष्य दोघे हे दृश्य पाहून आनंदसागरात बुडून गेले.

बोला भक्तिमती ब्राह्मणी, पवित्र भक्त मोहन आणि त्याचा लाडका गोपाळदादा यांचा विजय असो.

(स्वामी विवेकानंदांनी आपल्या लहानपणी ही कथा आपल्या एका दाईकडून ऐकली होती. स्वामीजींचे एक शिष्य एम्.सी.फैङ्की महोदयांनी लिहून ठेवले आहे की, या कथेचा स्वामी विवेकानंदांच्या जीवनावर सगळ्यात जास्त प्रभाव पडला होता. त्याच कथेच्या आधारावर ही कथा रचली आहे.)



# धन्ना जाट

ईश्वराची भक्ती सगळ्या जातीचे स्त्रीपुरुष करू शकतात. ज्याच्या चित्त-वृत्तिरूप सरितेचा प्रवाह ईश्वररूपी परमानंदाच्या महासागराकडे वाहू लागतो, तोच भक्ती करायला पात्र आहे आणि त्याच्यावरच भक्तांना प्रिय अशा भगवंताची कृपा होते.

भक्त धन्नाजी एक जाट होते. त्यांनी विद्याध्ययन वगैरे काहीच कधी केले नव्हते. पुराणांचे श्रवणही कधी शक्य झाले नाही. परंतु त्यांचे साधे भोळे मन ईश्वराच्या प्रेमाने भरलेले होते. ज्याच्या हृदयात प्रेमाचे बीज नाही, असा माणूस उभ्या संसारात शोधून सापडणार नाही. कमतरता असते ती सज्जनांच्या समागमरूपी अमृतसिंचनाची. त्याचमुळे त्या बीजातून अंकुर बाहेर येत नाही. आणि अंकुर बाहेर आला, तरी प्रतिकूल वातावरणामुळे वाढून पल्लवित, पुष्पित आणि फळांनी लगडून साऱ्या जगाला सुख देण्याआधीच नष्ट होऊन जातो. सज्जनांच्या सहवासाच्या अमृताचे नेहमी सिंचन होत राहिले, भगवन्नामरूपी अनुकूल वायू वाहात राहिला आणि दृढ श्रद्धा-विश्वासरूपी सावलीने तो सुरक्षित राहिला तर एके दिवशी नक्कीच तो विशाल आम्रवृक्ष होऊन अखिल विश्वाला आपल्या परिमळाने आणि मधुर अमृतमय फळांनी सुखी आणि तृप्त करू शकेल.

भक्तश्रेष्ठ धन्नाजींचे प्रेमबीज फारच लहानपणापासून संतांच्या सहवासाच्या अमृताने जीवन-शक्तीने संपन्न झाले होते. धन्नाचे वडील शेती करायचे. शिकलेले नव्हते पण त्यांचे हृदय साधे-भोळे पण श्रद्धा संपन्न होते. ते नेहमी यथाशक्ती संत, भक्त आणि महात्म्यांची सेवा करीत असत. त्या काळी आजच्यासारखा तथाकथित रोगट बुद्धिवाद बोकाळले नव्हता. तसेच दांभिक साधूंचा भारही या भारत-भूमीवर वाढलेला नव्हता

त्यामुळे सरळ मनाने साधूंची सेवा करण्यात फारशा अडचणी येत नसत. धन्नाच्या वडिलांच्याकडे वेळोवेळी चांगले-चांगले साधू महात्मे येत असत.

त्यावेळी धन्ना पाच वर्षाचा होता. एके दिवशी एक भगवद्भक्त ब्राह्मण साधू त्यांच्या घरी आला. ब्राह्मणाने आपल्या हाताने आडातून पाणी काढून स्नान केले. त्यानंतर संध्या-वंदनादी नित्य कर्मे करून झाल्यावर आपल्या झोळीतून भगवान शालिग्रामाची मूर्ती काढून तिला न्हाऊ घालून तुलसी, चंदन, धूप, दीपाने तिची पूजा केली. मग नैवेद्य दाखवून त्याने स्वत: भोजन केले. धन्ना त्या भक्तनिष्ठ ब्राह्मणाच्या सर्व क्रिया मोठ्या कौतुकाने पाहात होता. सरळ स्वभावाचा मुलगा. थोडावेळ साधूचा सहवास मिळाला. धन्नाच्या मनात आलं की, मला पण देवाची अशीच मूर्ती मिळाली तर मी पण अशीच पूजा करीन. मुलांचा स्वभाव असतो, जे पाहिले तसे करायचे. सरळ अंत:करणाचा धन्ना स्वाभाविकपणे गोड वाटणाऱ्या वाणीत ब्राह्मणाजवळ जाऊन म्हणाला, ''पंडितजी, आपल्याजवळ आहे, तशीच एखादी मूर्ती मला दिलीत तर मी पण आपल्याप्रमाणे तिची पूजा करीन.'' ब्राह्मणाने सुरवातीला फारसे लक्ष दिले नाही. परंतु बालक धन्ना परत परत रडून दीनवाणा होऊन त्यांना बेचैन करू लागला तेव्हा त्याची पीडा टाळण्यासाठी त्यांनी एक काळा दगड उचलून त्याला दिला आणि म्हणाले, ''मुला ! हा तुझा देव ! तू याचीच पूजा करीत जा.'' धन्नाला जणू ही गुरूकडून दीक्षाच मिळाली. या अत्यंत अल्पकालीन सज्जनाच्या सहवासाने आणि सरल हृदयाने केलेल्या भक्तीच्या प्रतापाने बालक धन्ना भगवंताला अत्यंत लवकर प्रसन्न करून घेण्यात यशस्वी झाला. सत्संगाचे माहात्म्य भगवान श्रीकृष्ण स्वत:च उद्धवाला सांगताना म्हणतात,

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्तं न दक्षिणा॥**

व्रतानि यज्ञश्छन्दांसि तीर्थानि नियमा यमाः।
यथावरुन्धे सत्सङ्गः सर्वसङ्गापहो हि माम्॥
सत्सङ्गेन हि दैतेया यातुधाना मृगाःखगाः।
गन्धर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः॥
विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोऽन्त्यजाः।
रजस्तमःप्रकृतयस्तस्मिंस्तस्मिन् युगेऽनघ॥
बहवो मत्पदं प्राप्तास्त्वाष्ट्रकायाधवादयः।
वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाथ विभीषणः॥
सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः।
व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथापरे॥
ते नाधीतश्रुतिगणा नोपासितमहत्तमाः।
अव्रतातप्ततपसः सत्सङ्गान्मामुपागताः॥
केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगाः।
येऽन्ये मूढधियो नागाः सिद्धा मामीयुरञ्जसा॥
यं न योगेन सांख्येन दानव्रततपोऽध्वरैः।
व्याख्यास्वाध्यायसंन्यासैः प्राप्नुयाद् यत्नवानपि॥
तस्मात्त्वमुद्धवोत्सृज्य चोदनां प्रतिचोदनाम्।
प्रवृत्तं च निवृत्तं च श्रोतव्यं श्रुतमेव च॥
मामेकमेव शरणमात्मानं सर्वदेहिनाम्।
याहि सर्वात्मभावेन मया स्या ह्यकुतोभयः॥

(श्रीमद्भा. ११।१२।१-९, १४-

''हे उद्धवा ! सगळ्या संगांपासून सोडविणाऱ्या सत्संगाने ज्या प्र
मी पूर्णपणे वश होतो, त्या प्रकारे योग, सांख्य, धर्म, वेदाध्य
तपस्या, त्याग, अग्निहोत्र, विहीर-आड बांधणे, बाग लावणे, द
दक्षिणा, व्रत, यज्ञ, मंत्र, तीर्थयात्रा, नियम आणि यम इत्यादी साध
होत नाही. भिन्न भिन्न युगात दैत्य, राक्षस, पक्षी, मृग, गंधर्व, अप

नाग, सिद्ध, चारण, यक्ष, विद्याधर आणि माणसात राजसी-तामसी प्रकृतीची वैश्य-शूद्र-स्त्री आणि अंत्यज आदी जातींची अनेक माणसे केवळ सत्संगाच्या प्रभावाने माझ्या परमपदाला प्राप्त झालीत. वृत्रासुर, प्रल्हाद, वृषपर्वा, बली, बाणासुर, मयासुर, विभीषण, सुग्रीव, हनुमान, जाम्बवान, गज, जटायू, तुलाधार वैश्य, व्याध, कुब्जा, वृंदावनातील गवळणी, यज्ञपत्न्या तसेच इतर अनेक जण, केवळ सत्संगाच्या प्रभावाने अनायासे माझ्या दुर्लभ पदाला प्राप्त झाले आहेत. तसेच गोपिका, यमलार्जुन, गायी, कालिया नाग आणि वृंदावनातील अनेक मृग, पक्षी आणि पाषाण, तृण, तरू, लता, कुंज इत्यादी सगळे केवळ सत्संगाच्या प्रभावामुळे अनायासे मला प्राप्त करून कृतार्थ झाले आहेत. या अज्ञानी आणि जडमतींपैकी कुणीही वेदांचे अध्ययन केलेले नाही, ऋषिमुनींची उपासना केली नाही. व्रत किंवा तपही केलेले नाही. हे उद्धवा ! म्हणूनच म्हणतो की, योग, ज्ञान, दान, व्रत, तप, यज्ञ, व्याख्याने, स्वाध्याय इत्यादींच्या द्वारे प्रयत्न करूनसुद्धा मी दुर्लभच आहे. केवळ भक्ती आणि सत्संग हीच दोन साधने अशी आहेत की ज्याने माझी प्राप्ती सुलभ होते. म्हणून हे मित्रा उद्धवा ! तू श्रुती, स्मृती, प्रवृत्ती, निवृत्ती, श्रोतव्य आणि श्रुत सर्वांचा त्याग करून सर्व शरीरधाऱ्यांच्या वतीने आत्म-रूप एकमात्र मला भक्तिपूर्वक आपले आश्रयस्थान बनव. मला शरण आल्याने तू भयापासून मुक्त होशील.'' अस्तु !

बालक धन्नाच्या आनंदाला पारावार उरला नाही. तो आपल्या देवाला कधी डोक्यावर ठेवतो आहे, तर कधी उराशी धरतो आहे. धन्नाच्या पूजेचा थाट वाढत गेला. धन्नाने खेळखेळणे सोडून दिले. तो रात्रीच उठून स्नान करू लागला. त्यानंतर देवाला स्नान घालून चंदनाच्या ऐवजी चांगली माती आणून देवाला तिचा टिळा लावी. तुलसीपत्राच्या ठिकाणी कुठल्याही झाडाची हिरवी पाने तोडून तो देवाला वाही. मोठ्या प्रेमाने पूजा करून भक्तिभावाने देवाला साष्टांग दंडवत घाली. आई जेव्हा

खायला बाजरीची भाकरी देई, तेव्हा धन्ना ती भाकरी देवासमोर ठेवून डोळे झाकी. मधून मधून डोळे उघडून पाहून घेई की, देवाने भाकरी खायला सुरवात केली की नाही. परत थोडा वेळ डोळे बंद करी. याप्रमाणे बसल्या बसल्या बराच वेळ झाला तरी देवाने भाकरी खाल्ली नाही, म्हणून त्याला खूप वाईट वाटे आणि तो बालकोचित सरळ स्वभाव आणि सरळ शब्दात अनेक प्रकारे देवाची आळवणी करी. तरीसुद्धा देव काही जेवत नाही, हे पाहिल्यावर त्याला वाटे की, देव आपल्यावर नाराज आहे. म्हणूनच माझ्या पूजेचा आणि नैवेद्याचा स्वीकार करीत नाही. परंतु देव उपाशी आणि मीच कसा जेवू ? हे कसे शक्य आहे ? हा विचार करून तो निराशेने भाकरी जंगलातच टाकून देई आणि स्वत:सुद्धा उपाशी राही. दुसऱ्या दिवशी परत हेच. याप्रमाणे बरेच दिवस अन्न-पाण्याशिवाय गेले, तेव्हा धन्नाला शक्ती उरली नाही. शारीरिक कष्टाची त्याला इतकी चिंता नव्हती, जितकी देव माझी भाकरी खात नाही याची. या अशा मनापासूनच्या दु:खामुळे त्याच्या डोळ्यांतून सदा-सर्वदा अश्रूंच्या धारा वाहू लागल्या.

इतके झाल्यावर तर परमेश्वराचे आसन डगमगणारच ! सरळ मनाच्या बालकाची फारच कठीण परीक्षा झाली. भक्ताच्या दु:खाने द्रवित होऊन भगवंत प्रकटले. **'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्'** ज्या सच्चिदानन्दघनाचे दर्शन, योग, समाधी आणि ज्ञाननिष्ठेने सुद्धा दुर्लभ आहे, ते परब्रह्म नारायण धन्नाच्या प्रेमाकर्षणाने अपूर्व असे मनमोहक रूप धारण करून भक्तासमोर प्रकटले आणि त्या **'प्रयतात्मन:'** प्रेम करणाऱ्या भक्ताची **'भक्त्युपहृतं'** भाकरी मोठ्या प्रेमाने खाऊ लागले. जेव्हा अर्धी भाकर त्यांनी संपवली, तेव्हा भाग्यवान धन्नाने त्यांचा हात धरला आणि म्हणाला, ''देवा ! इतके दिवस तर आला नाहीत, मला उपाशी ठेवलेत, आज आलात, तर सगळी भाकर एकटेच खाऊ लागलात! तुम्हीच जर सगळी भाकर खाऊन संपवली, तर आज सुद्धा मी उपाशीच राहू का ? मला थोडीशी सुद्धा देणार नाही का ?''

भक्त बालकाचे सरळ सुंदर वचन ऐकून भगवंत हसू लागले आणि त्यांनी राहिलेली भाकरी धन्नाला दिली. त्या भाकरीच्या गोडीचे वर्णन आज शेष- शारदेला सुद्धा करणे शक्य नाही. भक्त-वत्सल, करुणानिधी, कौतुक करणारे भगवंत रोज याचप्रमाणे प्रकट होऊन आपल्या जन-मन-हरण रूपमाधुर्याने धन्नाचे मन मोहित करू लागले. माणूस जोपर्यंत हे अनोखे रूप पाहात नाही, तोपर्यंतच त्याचे मन त्याच्या ताब्यात राहू शकते. ज्याला एकदा त्या रूप छटेच्या सौंदर्याचे दर्शन करण्याचे सौभाग्य प्राप्त झाले, त्याचे मन त्याच्या हातून कायमचेच गेले समजा. मग त्याला एका क्षणासाठी सुद्धा त्या सुंदर स्वरूपाला सोडून जगातली दुसरी कोणतीही गोष्ट आवडणार नाही. धन्नाची पण हीच दशा झाली. क्षणभर जरी त्याला ते मनमोहक स्वरूप समोर किंवा अंत:करणात दिसेनासे झाले, तर तो त्याच क्षणी बेशुद्ध होऊन पडे. भगवंताचा क्षणाचा वियोगही त्याला असह्य होई. त्यामुळे भगवंताला सदैव धन्नाच्या बरोबर किंवा त्याच्या अंत:करणात राहावे लागे. धन्नाने प्रेमरज्जूंनी भगवंताला बांधून टाकले. त्यामुळे भक्ताचे श्रेष्ठ धन भगवंतसुद्धा धन्नाला एका क्षणासाठी सुद्धा एकटा सोडत नसत. भगवंतांची तर प्रतिज्ञाच आहे की,

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति॥**

(गीता ६/३०)

''जो सगळ्यांत मला पाहतो आणि माझ्यात सगळ्यांना पाहतो त्याच्यापासून मी कधीच अदृश्य होत नाही आणि तोही माझ्यापासून कधीच अदृश्य होत नाही.''

धन्ना थोडा मोठा झाला. त्यामुळे आईने त्याला गायीच्या धारा काढण्याचे काम दिले. बऱ्याच गायी होत्या. धन्ना दोन्ही वेळेस धारा काढी. एके दिवशी भगवंत प्रकटले आणि धन्नाला म्हणाले, बाबा रे, तुला

इतक्या गायींच्या धारा काढायच्या म्हणजे बराच त्रास होत असणार! तुझ्या गायींच्या धारा मी काढीत जाईन.

सुर-मुनि-वन्दित, सकल-चराचर-सेव्य, अखिल विश्वाचे स्वामी भगवंत आपल्या बालक भक्ताबरोबर राहून त्याची सेवा करू लागले. धन्य ! धन्नाच्या सुखाचे काय वर्णन करावे ! तो सतत त्या परम सुखरूप भगवंताबरोबर राहून अप्रतिम, अचिन्त्य आनंदाचा उपभोग घेत राहिला.

काही दिवसांनी धन्नाचे गुरू तेच ब्राह्मण धन्नाच्या घरी परत आले आणि विचारू लागले की, ''भगवंताची पूजा करतोस की नाही?'' धन्ना हसून म्हणाला, ''महाराज ! आपण फारच चांगला देव देऊन गेलात. पुष्कळ दिवस तर त्याने मला दर्शनही दिले नाही, भाकरीसुद्धा खाल्ली नाही. स्वत: ही उपाशी राहिला आणि मलाही उपाशी ठेवले. शेवटी एके दिवशी प्रकटला आणि सगळी भाकरी एकटाच संपवू लागला. मोठ्या मुश्किलीने मी त्याचा हात धरून माझ्यासाठी अर्धी भाकर ठेवायला लावली. पण महाराज ! तो आहे मोठा प्रेमळ. नेहमी माझ्याबरोबर राहतो. माझ्या गायींच्या दोन वेळच्या धारा काढून देतो. मी पण त्याला सोडू शकत नाही. तो फारच गोड आणि सुंदर आहे. माझा तर तो प्राणच आहे.

धन्नाचे बोलणे ऐकून ब्राह्मण आश्चर्याने म्हणाला, ''कुठे आहे तुझा तो देव ?'' धन्ना म्हणाला, ''म्हणजे ? तुम्हांला तो दिसत नाही? हा काय माझ्याजवळ तर उभा आहे.'' ब्राह्मणाला दर्शन झाले नाही. तो म्हणाला, ''धन्ना! कुठे आहे तो ? मला तर दिसत नाही.'' धन्ना देवाला म्हणू लागला, ''नाथ ! हाच ब्राह्मण तर मला तुमची मूर्ती देऊन गेला होता. आता याला तुम्ही दर्शन का बरे देत नाही ?'' भगवंत म्हणाले, ''धन्ना ! जन्मजन्मान्तरीचे महान पुण्य आणि शुद्ध मनाने तू माझी भक्ती केलीस, म्हणून माझे दर्शन तुला झाले. या ब्राह्मणात इतके तपोबल नाही. परंतु तुझा गुरू होऊन याने फार मोठे पुण्य प्राप्त केले आहे. या पुण्यसंचयामुळे याला माझे दर्शन होऊ शकेल. तू त्याच्या मांडीवर जाऊन बैस. तुझ्या

पवित्र शरीराच्या स्पर्शाने याला दिव्य-दृष्टी प्राप्त होईल. आणि मग तो मला पाहू शकेल.''

धन्नाने सांगितल्याप्रमाणे केले. भक्त ब्राह्मण, भक्तवत्सल भगवंताची अपूर्व रूपछटा पाहून कृतकृत्य झाला. त्यानंतर भगवंत अन्तर्धान पावले.

धन्नाची बाललीला समाप्त झाली. म्हणून भगवंताने त्याच्याबरोबर आता बालकोचित संबंध ठेवायचे थांबविले. भगवंताने धन्नाला परंपरेचे रक्षण करण्यासाठी नियत कर्मानुसार गुरुमंत्र घेण्याची आज्ञा केली. धन्नाजी काशीला गेले आणि त्यांनी भक्तश्रेष्ठ श्री रामानंदांपासून दीक्षा ग्रहण केली. त्यानंतर ते घरी परतले. त्यांना भगवंतांचे तत्त्वदर्शन झाले. त्यामुळे ते आपल्या परम गुप्तधनाला हृदयाच्या गुप्त गंभीर गुफेतच ठेवू लागले.

एकदा धन्नाजीच्या वडिलांनी त्यांना शेतात गहू पेरण्यासाठी बी देऊन पाठविले. वाटेत काही संत भेटले. संत उपाशी होते. त्यांनी धन्नाजीना भिक्षा मागितली. धन्नाजीना तर सर्वत्र आपला श्यामसुंदर दिसत असे. त्या संतांतही त्यांना तोच दिसला. त्यांच्यासाठी न देण्यासारखी अशी कोणती वस्तू धन्नाकडे होती ? त्यांनी मोठ्या प्रेमाने सगळा गहू संतांना वाटून टाकला.

लक्षात ठेवायची गोष्ट अशी की, जिथे अभावग्रस्त गरीब माणसांना अन्न हवे असते, तिथे जणू साक्षात् नारायणच त्यांच्या रूपाने आमची सेवा मागत असतात. अशा प्रसंगी त्यांना मदत न करण्याची चूक करणाऱ्यांना नंतर पश्चात्ताप करावा लागतो. धन्नाजीसारखे भक्त अशी चूक कशी करणार ?

धन्नाजीने गहू तर वाटून टाकले; पण आई-वडिलांच्या भीतीमुळे तसेच परत घरी जाणे योग्य नाही असे समजून शेतात गेले आणि नुसता नांगर फिरवून घरी परतले. भक्तकल्पतरू भगवंताने न मागताच धन्नाचा गौरव वाढविण्यासाठी आपल्या अघटित घटना करणाऱ्या मायेने सगळ्यांच्या

शेतापेक्षा धन्नाच्या शेतात अमाप गहू पिकवला. धन्नाच्या शेताची भरपूर प्रशंसा होऊ लागली. ती प्रशंसा ऐकून धन्नाजी विचार करू लागले की, मी तर शेतात एक बी टाकले नव्हते. मग हे इतके सुंदर पीक आले म्हणतात, ते कसे ? शेत वाळून गेलेले असणार आणि माझी टिंगल करण्यासाठी हे लोक असे म्हणत असावेत. परंतु त्यांनी स्वत: जाऊन जेव्हा आपले शेत पाहिले, हवेत डुलणारे आणि पिकाने भरलेले, तेव्हा त्यांच्याही आश्चर्याला पारावार उरला नाही. भगवंताची करणी मानून त्यांनी मनातल्या मनात त्याला प्रणाम केला. धन्नाजींच्या हृदयात प्रेमाचा सागर उसळू लागला. संतांचे चरित्र लिहिणारे नाभाजी महाराज धन्ना जाटच्या जीवनातल्या या घटनेचे वर्णन करताना लिहितात,

'घर आये हरिदास तिन्हैं गोधूम खवाये।
तात मात डर थोथ खेत लंगूर बवाये॥
आसपास कृषिकार खेतकी करत बड़ाई।
भक्त भजेकी रीति प्रगट परतीति जु पाई॥
अचरज मानत जगतमें कहुँ निपज्यो कहुँ वैबयो।
धन्य धनाके भजनको, बिनहि बीज अंकुरभयो॥

❑ ❑

# चंद्रहास

द्वापार युगातील गोष्ट आहे. केरळमध्ये मेधावी नावाचा एक धर्मात्मा राजा राज्य करीत होता. त्याच्या एकुलत्या एका राजपुत्राचे नाव होते चंद्रहास. चंद्रहास खूपच लहान वयाचा असताना शत्रूंनी केरळाधीशाला युद्धात मारून टाकले. चंद्रहासची पतिव्रता आई सती गेली. राज्यावर दुसऱ्यांनी अधिकार स्थापन केला. या संकटकाळी चंद्रहासाची दाई त्याला घेऊन गुपचुप कुंतलपुर नगरात राहू लागली. स्वामिभक्त दाईने चंद्रहास तीन वर्षाचा होई तोवर मेहनत-मजुरी करून त्याचे पुत्रवत् पालन केले. त्यानंतर तीही मरण पावली.

चंद्रहास अनाथ आणि निराश्रय झाला. पण अनाथांचा नाथ ईश्वर निराधारांचा आधार असतो. तो विश्वंभर सगळ्यांचे पालन-पोषण करतो. भगवंताच्या कृपेमुळे चंद्रहासाचे पालन नगरातील स्त्रिया करू लागल्या. त्याच्या सुंदर मुखकमलाने सर्वांना मुग्ध केले. जी स्त्री त्याला पाही, ती स्त्री त्यावर पुत्रवत् प्रेम करू लागे. त्याला खायला प्यायला देई. घालायला कपडे देई. एके दिवशी देवऋषी नारद फिरत फिरत तिकडे आले. मुलाला पाहून त्यांना वाटले, हा अधिकारी बालक आहे. म्हणून त्यांनी त्याला श्रीशाळिग्रामाची मूर्ती आणि रामनामाचा मंत्र दिला. शुद्ध-हृदय शिशू मोठ्या प्रेमाने मूर्तीची पूजा आणि हरिनाम - संकीर्तन करू लागला. शैशवावस्था, सुंदर वदन, गोड रसाळ वाणी आणि श्रीहरिनामाचे गायन सगळ्याच गोष्टी मन मोहून टाकणाऱ्या होत्या. म्हणून जो चंद्रहासाला पाही, तो त्याच्यावर मुग्ध होऊन जाई. चंद्रहास बालपणापासूनच परम धार्मिक आणि अनन्य हरिभक्त बनला. जेव्हा तो आपल्या शरीराचे भान हरपून गोड आवाजात हरि नामाचे गान करी, तेव्हा त्याच्या चारी बाजूला एक दिव्य चांदणे पसरत जाई. त्यावेळी चंद्रहासाला वाटे की, एक जन-मन-मोहक सावळ्या रंगाचा बालक हातात मुरली घेऊन त्याच्याबरोबर

नाचू गाऊ लागला आहे. त्याचे प्राणांना मोहून टाकणारे सुर ऐकून चंद्रहासाची तन्मयता अधिकच वाढत जाई.

× × × × ×

कुंतलपुरचे राजा मोठे धर्मात्मा होते. पण त्यांना मुलगा नव्हता. केवळ एक रूपवान आणि गुणवती मुलगी होती. तिचे नाव होते चंपकमालिनी ! राजगुरु महर्षी गालव यांच्या उपदेशाप्रमाणे राजा आपला सारा वेळ भजन-स्मरण आणि सज्जनांच्या सहवासात घालवीत असे. राज्याचा कारभार धृष्टबुद्धी नावाचा मंत्री पाहात असे. कुंतलपुरचे राज्य जणू काय तोच चालवीत असे. त्याची स्वत:ची अशी वेगळी जहागीर होती. धन-संपत्तीचा हिशोब नव्हता. धृष्टबुद्धीला मदन आणि अमल नावाचे दोन सुयोग्य पुत्र आणि विषया नावाची एक सुंदर मुलगी होती. मदन आणि अमल राज्य कारभारात वडिलांना खूप मदत करीत असत. त्यातला मदन हा श्रीकृष्णाचा भक्त आणि उदार अंत:करणाचा होता. त्यामुळे मंत्र्याचा प्रासाद म्हटल्यावर जिथे विलासाचा राग-रंग हमखास असायचा, त्या ठिकाणी अधूनमधून संतांचा निवास, अतिथिसत्कार आणि भगवन्नामाचे संकीर्तनही होत असे. धृष्टबुद्धीला अशा गोष्टीत अर्थातच फारसा रस नव्हता. कारण तो रात्रंदिवस राज्याचा कारभार आणि धनसंचय करण्यातच गढून गेलेला असे. परंतु आपल्या सुपुत्र मदनाला प्रेमापोटी अशा कामापासून अडवीत नसे.

× × × × ×

संध्याकाळची वेळ. चंद्रहास स्वाभाविकपणे नाम-संकीर्तन करीत नगराच्या मार्गावरून चालला आहे. त्याचा गोड आवाज ऐकून दुसरी बरीच मुले त्याच्या पाठोपाठ चालली आहेत. सगळे आनंदाने नाचत-गात नगरवासियांचे चित्त आपल्याकडे आकर्षित करून घेत आहेत. फिरत फिरत हे प्रेममत्त बाल-कीर्तनकार धृष्टबुद्धीच्या प्रासादाजवळ गेले. मंत्रिपुत्र मदनाकडे ऋषिमंडळी आली आहे. हरिचर्चा चालू आहे. गोड आवाज ऐकून ऋषींनी आज्ञा केली, म्हणून मदनाने चंद्रहासाला आत बोलावून

आणले. चंद्रहासाबरोबर त्याच्या सोबत आलेली मुले नाचू-गाऊ लागली. मुनी मंडळी मुग्ध झाली. तेवढ्यात धृष्टबुद्धीही तेथे आला. मुनिवरांचे मन चंद्रहासाचा तेज:पुंज चेहरा आणि त्याची विमल शीतल छटा पाहून त्याच्याकडे आकृष्ट झाले. त्यांनी त्याला आपल्या जवळ बोलावून बसवले. त्याच्या शरीराची शुभलक्षणे पाहून आणि योगशक्तीने त्याच्या प्रतिभेचा परिचय प्राप्त करून सर्व ऋषी एका स्वरात म्हणू लागले की,

''मंत्रिमहाशय !

**सुन्दर लक्षण-युक्त बाल यह है तपधारी, मन्त्रीवर।**
**रक्खो, पालन करो इसे अति स्नेह भावसे अपने घर॥**
**सभी तुम्हारी धन-सम्पत्तिका यही पूर्ण स्वामी होगा।**
**होगा नृपति देशका, वैष्णव-पदका अनुगामी होगा॥**

''सुंदर लक्षणांनी युक्त अशा या तप करणाऱ्या बालकाला आपल्याकडे मोठ्या प्रेमाने ठेवून याचे चांगले संगोपन करा ! हाच तुमच्या सगळ्या संपत्तीचा स्वामी होणार आणि या देशाचा पण राजा होणार ! तसेच हा वैष्णवांच्या चरणांचा मोठा सन्मान करणारा होणार !''

ऋषींचे हे शब्द अभिमानी धृष्टबुद्धीच्या काळजात बाणासारखे बोचले. अज्ञात-कुल-गोत्राचा हा अनाथ बालक आणि माझ्या संपत्तीचा स्वामी होणार ? कुठे माझे वैभव, पदगौरव, प्रचंड प्रबल प्रताप आणि कुठे हा सडकेवरचा भीक मागणारा छोकरा ? ताबडतोब अभिमान द्वेषात बदलला. धृष्टबुद्धीच्या मनात भीषण हिंसावृत्ती निर्माण झाली. त्याने काय करायचे हे मनात ठरवून टाकले. ऋषी आणि आपल्या मुलांना काही न सांगता तो त्या बालकांना मिठाई देण्याच्या निमित्ताने आपल्या अंत:पुरात घेऊन गेला. तिथे बाकीच्या सर्व मुलांना तर मिठाई देऊन पाठवून दिले आणि चंद्रहासाला ठेवून घेतले. थोड्याच वेळात धृष्टबुद्धीच्या इशाऱ्यावरून तिथे एक विश्वासू मारेकरी हजर झाला. धृष्टबुद्धीने त्याच्या कानात जे काही सांगायचे ते सांगितले आणि चंद्रहासाला त्याच्या ताब्यात दिले.

मारेकरी चंद्रहासाला घेऊन निघाला, तेव्हा तो परत म्हणाला, ''हे बघ, आजच काम झाले पाहिजे. येताना खुणेसाठी काही तरी नक्की घेऊन ये. खूप बक्षीस मिळेल.''

मारेकरी चंद्रहासाला घेऊन निघून गेला.

× × × × ×

घनदाट निर्मनुष्य अरण्य. चोहीकडे अंधार पसरलेला. मारेकऱ्याने म्यानातून तलवार बाहेर काढली. चंद्रहासाच्या लक्षात आले की, त्याला आपल्याला मारायचे आहे. तो निर्भयपणे त्याला म्हणाला, ''बाबा रे थोडे थांब ! मला माझ्या ईश्वराची पूजा करू दे. मग मला खुशाल मारून टाक.'' मारेकऱ्याचे हृदय थोडे विरघळले. त्याने अनुमती दिली. चंद्रहासाने आपल्या तोंडातून शाळिग्रामाची मूर्ती काढून प्रेमाश्रू ढाळीत वनातील पत्र-पुष्पांनी ईश्वराची पूजा केली. त्यानंतर गद्‌गद वाणीत तो गाऊ लागला,

''गहो आज हाथ नाथ शरण मैं तिहारी।
तात मात बंधु भ्रात सुहृद सौख्यकारी॥
एक तुम्हीं सरबस मम प्रणत–दुःखहारी।
दास जानि इच्छाधीन इच्छित शुभकारी॥
*मृत्युमोहि, मोहन ! मोहि, मिलौ मोहि टारी।''*

''हे ईश्वरा ! आज माझा हात धरून माझा उद्धार कर. तूच माझा पिता-माता-बंधू-मित्र आणि सुखकर्ता आहेस ! तूच एक माझा प्राणसर्वस्व आणि दुःखाचे हरण करणारा आहेस. मी तुझा दास, तुझ्याच इच्छेवर सारे सोपवून जे घडेल ते शुभच असेल हे मानणारा आहे. मृत्यूलासुद्धा मोहून टाकणाऱ्या मनमोहना, माझा उद्धार करून मला भेट.''

वनस्थळीत करुणरस दाटला. भगवंताने यंत्र फिरवले. मारेकऱ्याच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. त्याचे हृदय पालटले. त्याने मनातल्या मनात विचार केला. ''अशा ईश्वरभक्त बालकाचा मी जर वध केला, तर मेल्यावर माझी किती दुर्गती होईल, कुणी सांगावे ?'' वध करायचा विचार

त्याने सोडून दिला. पण धृष्टबुद्धीला दाखवण्यासाठी एखादी खूण तर न्यावी लागणार ! ती काय न्यावी, याचा विचार करीत असताना त्याची दृष्टी अचानक चंद्रहासाच्या पायाकडे गेली. चंद्रहासाच्या एका पायाला सहा बोटे होती. त्याचा चेहरा उजळला. त्याने चटकन तलवारीने चंद्रहासाच्या पायाचे सहावे बोट कापून घेतले. अशुभ आपोआप नष्ट झाले. चंद्रहासाला तिथेच सोडून मारेकरी निघून गेला. त्याने धृष्टबुद्धीला नेऊन कापलेले बोट दाखवले. त्याच्या आनंदाला पारावार उरला नाही. त्याला वाटले की आज आपल्या बुद्धिकौशल्याने ऋषींची अमोघ वाणीसुद्धा मी खोटी सिद्ध करून टाकली.

घनदाट अरण्यात एकटा सुकुमार बालक. पायाला प्रचंड वेदना होत असतानाही तोंडाने श्रीकृष्णाचे नामस्मरण चालूच. तेवढ्यात त्याने पाहिले की, एक स्निग्ध, नील ज्योती त्याच्याकडे येऊ लागली आहे. त्याचवेळी अचानक जादू झाल्याप्रमाणे त्याला होणाऱ्या वेदना नष्ट झाल्या. तहान, भूक शांत झाली. मुख-कमल प्रफुल्लित झाले. अंतःकरणात परमानंद दाटला. वनातल्या हरिणी येऊन त्याचे पाय चाटू लागल्या. पक्ष्यांनी सावली केली. वृक्ष फळे देऊ लागले. पृथ्वी कोमल झाली. बालक चंद्रहास मुग्ध चित्ताने मधुर आवाजात ईश्वराचे नाव घेऊ लागला. भीषण अरण्य हरिनामाच्या ध्वनीने निनादित झाले. पशु-पक्षी दाट मैत्री असल्यासारखे त्याच्याबरोबर खेळू लागले.

× × × × ×

कुंतलपुर राज्यात चंदनपुर नावाचे एक छोटे संस्थान होते. तिथल्या राजाचे नाव होते कुलिंदक. संस्थान लहान असले तरी धन-धान्य आणि धर्माने परिपूर्ण होते. अभाव होता तो एकाच गोष्टीचा की राजाला पुत्र नव्हता. देवाची माया ! राजा कुलिंदक काही कामासाठी ज्या वनातून चालला होता त्यातच मारेकरी चंद्रहासाला सोडून गेला होता. गोड कीर्तन-ध्वनी ऐकून राजा चंद्रहासाजवळ गेला आणि बालकाचे मोहक स्वरूप पाहून तो त्याच्यावर मुग्ध झाला. राजाने धावत जाऊन बालकाला

उचलून कडेवर घेतले आणि त्याच्या अंगावरची धूळ झाडून त्याला त्याच्या माता-पित्याचे नाव-गाव विचारले. चंद्रहास म्हणाला, **मम माता पिता कृष्णस्तेनाहं परिपालित:।** ''माझे माता-पिता श्रीकृष्ण असून तेच माझे पालन पोषण करतात.''

राजाला वाटले की, ईश्वरानेच कृपा करून या वैष्णव देवशिशूला माझ्यासाठीच पाठवले आहे. त्याने चंद्रहासाला हृदयाशी कवटाळले आणि घोड्यावर बसवून त्याला घरी घेऊन आला. राणी पुत्रवती झाली. राजाने दत्तक-ग्रहणाची घोषणा केली. नगरात चोहीकडे आनंदी आनंद झाला.

चंद्रहासाने प्रारंभी शिकण्यात फारशी रुची दाखवली नाही. गुरू शिकवू लागले की, तो म्हणे माझी जीभ हरिनामाशिवाय दुसऱ्या कशाचा उच्चारच करू शकत नाही. परंतु यज्ञोपवीत ग्रहण केल्यानंतर थोड्याच दिवसांनी तो चार वेद आणि सगळ्या विद्यांत निपुण झाला. आपल्या सद्गुणांनी तो लवकरच राजपरिवाराचा आणि प्रजाजनांच्या जीवनाचा आधार बनला. राज्यात सर्वत्र धार्मिक भावना पसरली. हरि-गुणगानाने छोटेसे संस्थान भारून गेले. घरोघरी हरि-नामाची चर्चा होऊ लागली. सगळे लोक एकादशीचे व्रत आणि ईश्वराची उपासना करू लागले. चंद्रहासाने प्रत्येक शाळेत हरि-गुण-गान अनिवार्य केले. त्याचा सिद्धांत होता की,

**यस्मिञ्छास्त्रे पुराणे च हरिनाम न दृश्यते।**
**श्रोतव्यं नैव तच्छास्त्रं यदि ब्रह्मा स्वयं वदेत्॥**

''ज्या शास्त्रपुराणात हरिनाम नाही, ते ब्रह्मदेवाने जरी रचलेले असले, तरी ते श्रवण करण्यास योग्य नाही.''

× × × × ×

चंद्रपूर संस्थानाला कुंतलपुरच्या राजाला दरवर्षी दहा हजार स्वर्णमुद्रा

कररूपाने द्याव्या लागत. चंद्रहासाने त्या स्वर्णमुद्रांबरोबरच शत्रुराजांवर विजय प्राप्त करून मिळवलेली खूप संपत्ती कुंतलपुरला पाठवून दिली.

धृष्टबुद्धीच्या कानावर गेले की, चंदनपुर राज्य धन-धान्य आणि ऐश्वर्याने सम्पन्न झाले आहे, वीर युवराजाने मोठ-मोठ्या राज्यांवर विजय मिळवला आहे, तिथली प्रजा सर्वार्थाने सुखी आहे, राज्यात सर्वत्र हरिनामाचा गजर होतो आहे. तेव्हा त्याला वाटू लागले की, एकदा जाऊन तिथली सगळी परिस्थिति पाहिली पाहिजे. धृष्टबुद्धी कुंतलपुराहून निघून लवकरच चंदनपुरला पोचला.

धार्मिक राजा आणि शूरवीर राजकुमाराने त्याचे मनापासून स्वागत केले. धृष्टबुद्धी युवराजाचा चेहरा पाहताच चकित झाला आणि टक लावून त्याच्याकडे पाहू लागला. चंद्रहासाला ओळखताच त्याच्या काळजाला आग लागली. त्याने मनोमन कारस्थान रचले. त्याने धोका देऊन चंद्रहासाचा वध करण्याचा निश्चय करून आपला थोरला मुलगा मदन याच्या नावाने एक पत्र लिहून हसत हसत ते चंद्रहासाच्या हातात देत तो म्हणाला, "राजकुमार ! फारच जरूरीचं काम आहे. या कामामुळे तुमचं आणि आमचं मोठं हित साधणार आहे. म्हणून आजच कुंतलपूरला जाऊन हे पत्र कुमार मदनला नेऊन द्या. आणि हे पाहा, वाटेत हे पत्र उघडायचं नाही आणि पत्राचं गुपित कुमार मदनशिवाय दुसऱ्याला कळता कामा नये."

× × × × ×

चंद्रहास तत्काळ घोड्यावर बसून निघाला. कुंतलपूर तिथून चोवीस कोसांवर होते. पोहोचता पोहोचता दिवस कलला. नगराच्या बाहेर कुंतलपूर नरेशांचा सुंदर बगीचा होता. चंद्रहास आपला शीण घालवण्यासाठी आणि पाणी पिण्यासाठी तेथे थांबला. सुंदर सरोवराचे पाणी तो प्याला आणि घोड्यालाही पाजले. प्रवासाचा शीण होता. घोड्याला जवळच एका झाडाला बांधून तो एका झाडाच्या सावलीत आडवा झाला. शीतल-मंद-सुगंधित वायूच्या स्पर्शाने त्याला झोप आली.

त्याचवेळी राजकुमारी चंपकमालिनी आणि मंत्र्याची कन्या विषया या दोघी आपल्या मैत्रिणीसह बागेत फिरायला म्हणून आल्या. नाना प्रकारचे खेळ खेळून राजकुमारी आणि दुसऱ्या मैत्रिणी निघून गेल्या. दैवी प्रेरणेने विषया मागे थांबली. अनंग-मद-मोचन राजकुमार चंद्रहासाला पाहताच तिचे मन त्याच्यावर बसले. मनोमन तिने राजकुमार चंद्रहासाचा आपला पती म्हणून स्वीकार केला. तिने पाहिले की, त्याच्या हातात पत्र आहे. विषयाने हळूच ते काढून घेतले. आपल्या भावाच्या-मदनाच्या नावाचे आणि वडिलांच्या हस्ताक्षरातले ते पत्र पाहून तिच्या मनात उत्सुकता निर्माण झाली आणि तिने ते पत्र उघडून वाचले. परंतु पत्र वाचताच तिचे हृदय व्याकूळ झाले, शरीर थरथर कापू लागले, चर्येवर विषाद पसरला. पत्रात लिहिले होते की,

**स्वति श्री प्रिय पुत्र मदन ! देखत यह पाती।**
**विष दे देना जिससे हे मम शीतल छाती॥**
**कुल विद्या सौन्दर्य शूरता कुछ न देखना।**
**मदन शत्रु इस राजकुँवर को हृदय लेखना॥**

विषयाने विचार केला की, अशा सुंदर मोहक सिंहशावक अशा राजकुमाराला पिताजी विष द्यायला का बरे सांगतील ? मला तर वाटतं की, मला अनुरूप वर पाहून आनंदाच्या भरात त्यांच्या हातून लिहिण्यात चूक झाली असावी. खरं म्हणजे **'विष दे देना'** च्या जागी **'विषया देना'** असं लिहायला पाहिजे होतं. पिताजींनी 'छाती शीतळ होईल' असे लिहिले आहे. अशा नरश्रेष्ठाला विष देऊन कुणाची छाती शीतळ होईल? मोठ्या भाग्याने असा जावई मिळतो ! म्हणूनच तर पिताजींनी कुल, विद्या आदी काही न पाहता 'मदनशत्रु' म्हणजे सौंदर्यात कामदेवाला सुद्धा पराभूत करणाऱ्या या नयनाभिराम राजपुत्राच्या हातात माझा हात ताबडतोब देऊन टाकावा, असे लिहिले आहे. बरे झाले, पत्र आधी माझ्या हाती लागले. ही तर ईश्वराचीच कृपा ! नाहीतर बंधुराजांनी चुकून विष देऊन

टाकलं असतं, तर अनर्थ झाला असता ! विषयाने असा विचार करून तावडतोब 'विष दे देना' यातील 'दे' अक्षर खोडून त्या ठिकाणी 'या' अक्षर विष शब्दाला जोडून लिहिले. त्यामुळे 'विषया देना' हे स्पष्ट वाचता येऊ लागले. मदन शत्रू शब्द वेगवेगळे होते. त्या शब्दांनासुद्धा तिने जोडून टाकले. त्यामुळे 'मदन शत्रु' च्या ठिकाणी 'मदनशत्रु' वाचता येऊ लागले. त्यानंतर आंब्याच्या डिंकाने पत्र जसेच्या तसे बंद करून राजकुमाराच्या हातात ठेवून ती धावत थोड्या अंतरावर पुढे जाणाऱ्या आपल्या मैत्रिणींच्या घोळक्यात मिसळली. राजकुमारी आणि मैत्रिणी तिला छेडू लागल्या.

× × × × ×

थोड्याच वेळात चंद्रहासाला जाग आली. संध्याकाळ होऊ घातली होती. त्याने लगबगीने जाऊन मंत्री-पुत्र मदनाला पत्र दिले. पत्र वाचून मदनला अत्यंत आनंद झाला. ब्राह्मणांनी मुहूर्त सांगितला. त्याच दिवशी गोरज मुहूर्तावर विषया आणि चंद्रहासाचा विवाह मोठ्या धूमधडाक्यात झाला. मदनने याचकांना मुक्त हस्ताने दान देऊन संतुष्ट केले. कन्यादान-सोहळ्यास कुंतलपूर नरेश जातीने हजर होते. राजकुमार चंद्रहासाची मनमोहक रूप-गुण-राशी पाहून राजाने विचार केला की, 'चंपकमालिनीसाठी याच्यापेक्षा अधिक योग्य असा वर शोधून सापडणार नाही. त्याचप्रमाणे माझ्या राज्यशासनासाठीही याच्याइतका बल-वीर्य-बुद्धी आणि सदाचारसम्पन्न योग्य उत्तराधिकारी नाही मिळायचा. राजाने त्या क्षणीच मनोमन ठरवून टाकले की, धीर-वीर राजकुमार चंद्रहासाबरोबरच आपली राजपुत्री चंपकमालिनीचा विवाह करायचा आणि आपले राज्य त्याला देऊन टाकायचे.

तीन दिवसांनी धृष्टबुद्धी परतला. सगळेच उलटे झालेले पाहून त्याला धक्काच बसला. परंतु त्याने आपल्या मनातील दुर्भावना कुणासमोर व्यक्त केली नाही. त्याच्या द्वेष आणि हिंसेने कडवटलेल्या अंत:करणाने निश्चय

केला की, 'आपली मुलगी विधवा झाली तरी चालेल; पण या शत्रूचा मात्र वध केलाच पाहिजे.' दुष्ट हृदयाची पराकाष्ठा म्हणतात ती ही.

नगरापासून दूर वनात डोंगरावर भवानी मातेचे मंदिर होते. धृष्टबुद्धीने एका निर्दय मारेकऱ्याला तिथे पाठवले आणि त्याला सांगितले की,आज संध्याकाळच्या नंतर जो कुणी तेथे येईल, त्याचे मस्तक कापून टाकायचे. इकडे चंद्रहासाबरोबर खोटे खोटे हसत त्याला तो म्हणाला, 'भवानी आई आमची कुल-स्वामिनी आहे. एखादे शुभकार्य आमच्या घरी झाले की, भवानी मातेच्या पूजेची आमची रीतच आहे. म्हणून आजच संध्याकाळी तुम्ही तिथे जाऊन भवानी मातेची पूजा करून या.''

सासऱ्याची आज्ञा म्हणून सरळ मनाचा चंद्रहास पूजेचे साहित्य घेऊन भवानी मंदिराकडे निघाला. माणूस मनातल्या मनात किती कुटिल भावना घेऊन शेख महंमदा प्रमाणे हवेत मनोरे बांधत राहतो. पण शेवटी तेच होते, जे भगवंताच्या मनात असते. **करी गोपालकी सब होय.**

कुंतलपुर नरेशांच्या मनात वैराग्य निर्माण झाले. त्यांनी त्याच दिवशी राज्याचा त्याग करून परमात्म-पद प्राप्तीसाठी साधना करण्यासाठी वनात जायचा निर्णय घेतला. परंतु जायच्या आधी राजकुमारीचा विवाह आणि राज्याच्या उत्तराधिकाऱ्याची नियुक्ती ही दोन आवश्यक कामे करायची होती. राजाने आधीच निश्चय केल्याप्रमाणे मंत्रिपुत्र मदनाला बोलावून सांगितले की, ''कुमार ! माझी आजच वनात जायची इच्छा आहे. चंपकमालिनीचा हात एखाद्या योग्य राजकुमाराच्या हातात देऊ इच्छितो. राज्याचा उत्तराधिकारी पण नेमायचा आहे. आम्हा सर्वांच्या भाग्याने ईश्वराने कृपावंत होऊन चंद्रहासाला इथे पाठविले आहे. तो सगळ्याच दृष्टीने योग्य आहे. तू आत्ताच्या आत्ता चंद्रहासाला इथे पाठवून दे.''

राजाचे बोलणे ऐकून सरलहृदय मदनाच्या मनात अपार हर्ष मावेना. तो आपल्या मेहुण्याला बोलावून आणण्यासाठी धावत निघाला. वडिलांच्या दुष्ट प्रवृत्तीची त्याला काहीच कल्पना नव्हती. चंद्रहास भवानी मातेच्या

दर्शनासाठी जात असताना त्याला वाटेतच भेटला. त्याने राजाज्ञा सांगून चंद्रहासाला राजमहालात पाठवून दिले आणि स्वत: पूजेचे ताट घेऊन भवानीमंदिराकडे निघाला. सांगायची गरजच नाही की, मंदिरात पोहोचताच मारेकऱ्याने तलवारीने त्याच्या शरीराचे दोन तुकडे करून टाकले. चंद्रहास वाचला.

**जाको राखै साँइयाँ, मार न सकिहैं कोय।**
**बाल न बाँका करि सकै, जो जग बैरी होय॥**

इकडे कुंतलपुर नरेशांनी चंपकमालिनीचा हात चंद्रहासाच्या हातात देऊन आशीर्वाद दिला आणि तिकडे गालवमुनींच्या आज्ञेने चंद्रहासाचा राज्याभिषेकसुद्धा झाला. चंद्रहासाने गालवमुनींच्या अनुमतीने चंपकमालिनीबरोबर गांधर्व विवाह केला. राजा सर्वस्वाचा त्याग करून माती, दगड आणि स्वर्ण या मध्ये समबुद्धी धारण करून वनात निघून गेला.

**'वनं जगाम सन्त्यज्य समलोष्टाश्मकाञ्चन:।'**

धृष्टबुद्धीने काय विचार केला होता आणि झाले काहीच्या काही- **तेरे मन कुछ और है कर्ताकि कछु और** ''आपल्या मनात एक असते तर कर्त्ताकरवित्या परमेश्वराच्या मनात दुसरेच !'' दुसऱ्या दिवशी सकाळी धृष्टबुद्धीने जेव्हा चंद्रहासाबरोबर चंपकमालिनीच्या विवाहाची तसेच त्याच्या राज्याभिषेकाची तसेच प्रिय पुत्र मदनाच्या मृत्यूची वार्ता ऐकली, तेव्हा तर त्याच्या मस्तकावर जणू वज्रपातच झाला. खरेच आहे. **''परार्थे योऽवटं कर्ता तस्मिन् स पतति ध्रुवम्।''** ''जो दुसऱ्यासाठी जो खड्डा खणतो, त्यात तो स्वत:च पडतो, हे निश्चित''!

धृष्टबुद्धी हतबुद्धी होऊन भवानी मातेच्या मंदिराकडे धावला. तिथे जाऊन पाहिले की प्राणाधिक प्रिय पुत्राचे शरीर दोन तुकडे होऊन पडले आहे. त्याने शोकविव्हल होऊन विलाप करीत आपल्या तलवारीने त्याच क्षणी स्वत:ची आत्महत्या केली.

आपल्या सासऱ्याला वेड्याप्रमाणे धावताना पाहून चंद्रहासपण त्याच्या

पाठोपाठ धावला. मंदिरात गेल्यावर चंद्रहासाने पाहिले की, दोघे पिता-पुत्र मरून पडले आहेत. चंद्रहासाला वाटले की, या दोघांच्या मृत्यूला तोच कारण आहे. म्हणून त्याने आत्महत्येचा विचार करून तलवार म्यानातून बाहेर काढली. तोच साक्षात् भवानी मातेने प्रकट होऊन त्याचा हात धरला आणि त्याला आपल्या मांडीवर घेतले. जन्मल्यापासून मातृहीन झालेल्या चंद्रहासाला जगत् जननीच्या कुशीत विसावून अत्यंत प्रसन्नता लाभली.

आई म्हणाली, ''माझ्या लाडक्या मुला ! धृष्टबुद्धी फारच दुष्ट होता. त्याने तुला मारण्यासाठी मोठमोठी कपट कारस्थाने केली. तो मेला हे चांगलेच झाले. आता हा मदन मात्र मोठा भक्त आणि तुझ्यावर प्रेम करणारा होता हे खरे. पण त्याने तुझ्या विवाहप्रसंगी जो काही दान-धर्म केला, तो खूप असून सुद्धा त्याला तो कमीच आहे असे वाटल्यावरून त्याने मनातल्या मनात संकल्प केला होता की, तो स्वतःच्या शरीराचे पण दान तुझ्यासाठी करणार ! म्हणजे आज तोसुद्धा ऋणमुक्त झाला. तू शोक सोड आणि राज्य कर ! मी प्रसन्न आहे ! तू तुला पाहिजे तो वर मागून घे.''

चंद्रहास म्हणाला, ''हे जननी ! तू जर माझ्यावर प्रसन्न असलीस, तर पहिला वर हा दे की, **''हरौ भक्तिः सदा भूयान्मम जन्मनि जन्मनि''** माझ्या मनात जन्मोजन्मी श्रीहरीची भक्ती सतत राहो आणि दुसरा वर दे की, माझ्या कारणाने या दोन व्यक्ती ज्या मरून पडल्या आहेत, त्या जिवंत व्हाव्यात. माझे सासरे धृष्टबुद्धी यांनी मला मारण्यासाठी जे काही केले, त्याचे मला अजिबात दुःख नाही. माणूस अज्ञानामुळे असे करीतच असतो. माते ! यांना क्षमा कर. यांना सुबुद्धी दे. यांच्या पापांचा नाश कर. यांना परमेश्वराची शुद्ध भक्ती प्रदान कर.,

भवानी माता 'तथास्तु' म्हणून अन्तर्धान पावली. दोघे पिता-पुत्र झोपेतून जागे झाल्यासारखे उठले आणि त्यांनी चंद्रहासाला कवटाळले.

भक्त आणि भगवंताचा जयजयकार असो !

❑ ❑

# सुधन्वा

''अहाहा ! किती थोर माझे भाग्य ! आज या निमित्ताने सगुणरूपात प्रकट झालेला सच्चिदानंदघन परमात्मा, पार्थाचे सारथ्य करणारा त्रिभुवन-मोहन श्रीकृष्ण परमात्मा याचे दर्शन करून मी माझ्या नेत्रांना धन्य करीन ! असे म्हणतात की, त्याचे सौंदर्य अतुलनीय आहे. त्याचे चरित्र अद्‌भुत आहे. या अभाग्या डोळ्यांनी आजपर्यंत भगवंताच्या सुंदर चरण कमळांचे दर्शन केले नाही. म्हातारपण आले ! आज रणांगणात त्याच्या चरणांचे दर्शन करून मी माझ्या जन्माचे सार्थक करीन !''

चंपकपुरीच्या भक्तराज हंसध्वजाने मनोमन अशी इच्छा बाळगून आपल्या सेनापतीला आदेश दिला की,

**न मया वीक्षितः कृष्णो वृद्धेनापि स्वचक्षुषा।**
**तस्मान्निर्यान्तु मे वीरा युद्धार्थं याम्यहं रणम्॥**

''वृद्धावस्था प्राप्त झाली तरी आजपर्यंत आपल्या डोळ्यांनी मी श्रीकृष्णाचे दर्शन करू शकलो नाही. म्हणून माझ्या सर्व वीर योध्यांनी युद्धासाठी प्रयाण करावे. मीपण त्यांच्याबरोबर येणार आहे.''

× × × × ×

पांडवांचा अश्वमेध यज्ञाचा घोडा चंपकपुरीच्या जवळ आला. महावीर अर्जुन दिव्य अस्त्र-शस्त्रांनी सुसज्ज होऊन आणि आपल्या प्रद्युम्नादी वीरांना घेऊन अश्वाचे रक्षण करण्यासाठी त्याच्या पाठोपाठ येऊ लागला. राजाने ही सुवार्ता दूतांच्याकरवी ऐकताच क्षत्रिय-धर्माप्रमाणे युद्धाची तयारी केली आणि एका एकनिष्ठ भक्ताप्रमाणे पार्थ-सारथी भगवंताच्या दर्शनाची प्रबळ इच्छा मनात ठेवून रणक्षेत्राकडे प्रयाण केले.

राजा हंसध्वज मोठे धर्मात्मा, शूरवीर आणि भगद्भक्त होते. त्यांच्या राज्याचे वैशिष्ट्य हे होते की, राजघराण्याच्या पुरुषांसहित प्रजेतील सर्व

पुरुष एकपत्नीव्रताचे पालन करणारे होते आणि देशातील सर्व स्त्री-पुरुष ईश्वराचे परम भक्त होते. राज्यात नोकरीसाठी बाहेरून कुणी माणूस आला, तर राजा सर्वप्रथम त्याला म्हणे की,

**एकपत्नीव्रतं तात यदि ते विद्यतेऽनघ।**
**ततस्त्वां धारयिष्यामि सत्यमेतद् ब्रवीमि ते॥**
**न शौर्यं न कुलीनत्वं न च क्वापि पराक्रमः।**
**स्वदाररसिकं वीरं विष्णुभक्तिसमन्वितम्॥**
**वासयामि गृहे राष्ट्रे तथान्येऽपि हि सैनिकाः।**
**अनङ्गवेगं स्वान्ते ये धारयन्ति महाबलाः॥**

''हे निष्पाप माणसा ! तू जर एकपत्नीव्रताचे पालन करणारा असशील, तरच मी तुला नोकरीवर ठेवू शकेन. मी खरेच सांगतो की, बिनकामाचे शौर्य, कुलीनता आणि पराक्रम मला नको आहे. जो वीर केवळ आपल्या पत्नीशी प्रेम करणारा आणि ईश्वरभक्तीने युक्त आहे, मी फक्त त्यालाच आपल्या घरात आणि राष्ट्रात स्थान देऊ शकतो ! जे कामदेवाच्या प्रबल वेगाला लगाम घालू शकतात, तेच खरे महाबली !''

**सर्वे ते वैष्णवा वीराः सदा दानपरायणाः।**
**एकपत्नीव्रतयुताः संयतास्ते प्रियंवदाः॥**

अशा प्रकारे अधिकारी आणि प्रजाजन सर्वांचे जीवन धर्म आणि सदाचारावर आधारलेले होते. राजाच्या सैन्यातील सर्व योद्धे, ईश्वरभक्त, सदसद्बुद्धियुक्त आणि हितकर बोलणारे होते. म्हणून राजाज्ञा मिळताच सगळे वीर योद्धे अर्जुनाबरोबर संघर्ष करायला तयार झाले. घोडा पकडण्यात आला आणि नीती व धर्मशास्त्राचे प्रगाढ पंडित राजगुरू ऋषिवर शंख आणि लिखित यांच्या आज्ञेनुसार असा कडक आदेश घोषित करण्यात आला की, ''अमक्या अमक्या वेळेपर्यंत सगळ्या योद्ध्यांनी युद्धक्षेत्रात उपस्थित राहावे. जो ठीक वेळेवर पोचणार नाही, त्याला उकळत्या

तेलाच्या कढईत टाकण्यात येईल. हा आदेश राजाचे नातू, पुत्र आणि बांधव यांना समानपणे बंधनकारक राहील.''

**न निर्गच्छति यः कश्चित् कटाहे तैलपूरिते।**
**पात्यते ज्वलिते घोरे नमृपुत्रसहोदराः॥**

राजाचे सर्व सेना-नायक, मंत्री, भाऊ आणि सुबल, सुरथ, सम आणि सुदर्शन नावाचे चारी पुत्र युद्धभूमीकडे निघाले. सगळ्यात छोट्या राजपुत्राचे नाव होते सुधन्वा. वीर सुधन्वा आपल्या वीर पुत्रांना जन्म देणाऱ्या मातेकडे आशीर्वाद मागण्यासाठी गेला आीण तिच्या चरणांचे वंदन करून म्हणाला, ''आई ! मी आज प्रख्यात वीर अर्जुनाबरोबर युद्ध करण्यास जात आहे. मी हे माझे भाग्य समजतो. आज्ञा दे म्हणजे पार्थाने ज्या हरी नामक घोड्याला आपल्या ताब्यात ठेवले आहे, त्याला मी जिंकून आणू शकेन.'' वीरमाता भगवंताची परमभक्त होती. तिला माहीत होते की या युद्धातून पुत्राचे परत येणे कठीण आहे. म्हणूनच ती म्हणाली,

**गच्छ पुत्र हरिं युद्धे विजित्य मम सन्निधौ।**
**हरिं चतुष्पदं त्यक्त्वा तं समानय मुक्तिदम्॥**

''वत्सा ! युद्धात पराक्रम करून 'हरी'ला जिंकून अवश्य आण ! पण चार पायाच्या हरि-पशूला (घोड्याला) आणू नकोस. त्याऐवजी मुक्ती देणाऱ्या हरीला जिंकून आण ! तुझ्या प्रतापी पित्याने आजवर युद्धात मोठमोठ्या वीरांवर विजय प्राप्त केला आहे, पण कंसवध करणाऱ्या श्रीकृष्णाचे दर्शन अद्याप झाले नाही. हे पुत्रा ! आज तू आम्हां सगळ्यांना श्रीकृष्णाचे दर्शन घडवून आणणारा हो ! आज तू असे काही कर की, ज्यामुळे भगवान श्रीकृष्ण प्रसन्न व्हावेत. तू मोठा भाग्यशाली आहेस. कारण तुझ्या नेत्रांना आज श्रीकृष्णाचे दर्शन घडणार आहे ! पण भगवान श्रीकृष्णांची प्राप्ती फार कठीण आहे. मी एक युक्ती सांगते. भगवंत भक्तवत्सल आहेत. त्यांनी आपल्या भक्तवत्सलतेमुळेच कुरुक्षेत्राच्या भीषण युद्धात अर्जुनाचा रथ हाकला होता. आजसुद्धा ते अर्जुनाच्या

रक्षणासाठी धाऊन येऊ शकतात. म्हणून तू जर युद्धात आज अर्जुनाला सळो की पळो करू शकलास, त्याला व्याकूळ करू शकलास, तर श्रीकृष्ण तुझ्यासमोर प्रकट होतील. मी असे ऐकले आहे की, ज्याप्रकारे वनात गेलेल्या वासराला सोडून गाय घरी परतत नाही, त्याचप्रमाणे भगवान श्रीकृष्णपण आपल्या भक्ताला सोडू शकत नाहीत.

**स्वभक्तं न त्यजत्येष मनाक् पुत्र मया श्रुतम्।**
**यथा वनगतं वत्सं त्यक्त्वा नायाति गौस्तथा॥**

भगवंत आपल्या भक्ताला संकटकाली एकटा सोडत नाहीत. बाळा! तू त्या भक्तवत्सल श्रीकृष्णाला भिऊ नकोस. त्याना घाबरणारा जगूच शकत नाही. जर तू घाबरलास, तर सगळे मला हसतील आणि म्हणतील, बघ, तुझा मुलगा श्रीकृष्णाला पाहून रणातून पळून आला ! जर तू लढता लढता रणभूमीवर धारातीर्थी पडून वीरांना प्राप्त होणाऱ्या श्रेष्ठ गतीला पावलास, तर मला त्यात आनंद वाटेल. मुला ! ही गोष्ट नीट लक्षात ठेव की, युद्धात भगवान श्रीकृष्णासमोर मरणारा माणूस खरे म्हणजे मरत नसतो, तर तो आपल्या एकवीस पिढ्यांचा उद्धार करीत असतो.

**हरेः किं सुम्मुखे पुत्र पतितः पतितो भवेत्।**
**तेनैव चोद्धृताः सर्वे आत्मना चैकविंशतिः॥**

जगात त्याच मातांना रडावे लागते, ज्यांचे पुत्र-पौत्र भगवंताच्या चरणी समर्पित होत नाहीत.

माता सुमित्रेने आपल्या पुत्राला-लक्ष्मणाला हाच उपदेश केला होता की,

**'पुत्रवती जुबती जग सोई।**
**रघुपति भगतु जासु सुत होई॥**
**नतरु बाँझ भलि बादि बिआनी।**
**राम बिमुख सुत तें हित जानी॥**

"प्रभू रामचंद्राची भक्ती करणाऱ्या पुत्राला जन्म दिला, तीच स्त्री या जगात पुत्रवती म्हणावी लागेल ! राम-भक्तीपासून विन्मुख असलेल्या पुत्राला जन्म देण्यापेक्षा वांझ राहणे चांगले !"

मातेचा सदुपदेश ऐकून वीर सुधन्वा मातेला संतोष होईल, अशा शब्दांत म्हणाला, "आई ! तुझ्या आज्ञेप्रमाणे युद्धात प्राण पणाला लावून लढेन आणि हरीला घेऊन परतेन. पुरुषार्थ करणे माझ्या हातात आहे, फळ ईश्वराधीन ! पण श्रीकृष्णाला पाहून जर मी माघारी फिरलो, तर तुझ्या पोटी मी जन्म घेतला, असं म्हणणार नाही. आणि मला मेल्यावर सद्‌गतीसुद्धा मिळू नये !" धन्य तो वीर !

त्यानंतर भगिनी कुवलाचा निरोप घेऊन आणि उत्साहित होऊन तो त्याची पत्नी सती प्रभावतीकडे गेला. ती आधीच सोन्याच्या ताटात निरांजन, चंदन-कापूर घेऊन त्याला ओवाळण्यासाठी दारावर उभी होती. सती प्रभावतीने अत्यंत भक्तिभावाने वीर पतीची पूजा केली. त्यानंतर धैर्याने त्याला ओवाळीत नम्रपणे अत्यंत प्रेमाने रहस्यमय शैलीत म्हणाली, "हे प्राणनाथ ! मी आपल्या श्रीकृष्णदर्शनार्थी मुखकमलाचे दर्शन करीत आहे; पण हे नाथ, मला असे वाटते की, आज आपले एकपत्नीव्रत नष्ट होणार आहे. पण आपण ज्यांच्यावर अनुरक्त होऊन उत्साहाने जात आहात, ती स्त्री माझी बरोबरी कधीच करू शकणार नाही. तुम्हांला सोडून मी चुकूनसुद्धा पर-पुरुषाकडे कधी पाह्यले नाही. पण ती 'मुक्ती' नावाची रमणी तर पिता-पुत्र सगळ्यांबरोबर रममाण होते. आपल्या मनात 'मुक्ती' ठसलेली आहे. म्हणूनच श्रीकृष्णांच्या माध्यमातून तिला भेटायच्या लालसेने आपली धडपड चालली आहे. पुरुषांचे चित्त देवरमणींच्याकडे आकर्षित होतच असते. पण आपण हे निश्चित समजा की, श्रीहरीच्या अतुलनीय मुख–सौंदर्यापुढे मुक्ती आपल्याला कधीच प्रिय वाटणार नाही. कारण त्यांच्या प्रेम-माधुर्यावर स्वत:चा जीव ओवाळून टाकणारे त्यांचे भक्त मुक्तीची कधीच इच्छा बाळगीत नाहीत. मुक्ती तर

दासीसारखी त्या भक्तांच्या चरणसेवेची संधी शोधीत त्यांच्या मागे मागे हिंडत असते. पण ते तिच्याकडे ढुंकूनसुद्धा पाहात नाहीत. इतकेच काय स्वत: भगवान हरी त्यांना मुक्ती देण्याची इच्छा करीत असले, तरी ते तिचा स्वीकार करीत नाहीत. म्हणूनच श्रीकृष्णांनी त्यांचे गुणगान करताना म्हटले आहे की,

**सालोक्य-सार्ष्टि-सामीप्य-सारूप्यैकत्वमप्युत ।**
**दीयमानं न गृह्णन्ति विना मत्सेवनं जना: ॥**

(श्रीमद्भागवत - ३-२९-१३)

"माझ्यावर प्रेम करणारे माझे भक्त माझी सेवा सोडून सलोकता, सार्ष्टि, समीपता, सरूपता आणि एकता या पाचही प्रकारच्या मुक्ती मी दिल्या तरी स्वीकारीत नाहीत." म्हणूनच जोपर्यंत आपण श्रीकृष्णाच्या अतुलनीय रूपाचा गोडवा पाहिला नाही, तोपर्यंतच आपण मुक्तीची इच्छा करीत आहात. शिवाय पुरुषांप्रमाणे स्त्री परपुरुषांकडे जात नाही. नाहीतर आपण निघून गेल्यावर जर मी 'मोक्षा'कडे गेले, तर आपण काय करू शकणार आहात ? पण 'विवेक' नावाचा अदृश्य मुलगा माझे नेहमी रक्षण करतो. ज्या स्त्रियांना 'विवेक' नावाचा मुलगा नसेल, त्याच पर-पुरुषाकडे जातात. मला लहानपणापासूनच विवेक-पुत्र लाभलेला आहे. म्हणून हे नाथ ! मला 'मोक्षा'कडे जायला संकोच वाटतो.

पत्नीच्या मधुर, मार्मिक बोलण्याला उत्तर देत सुधन्वा म्हणाला, "हे सुंदरी ! जर मी श्रीकृष्णाबरोबर लढायलाच जात आहे, तर तुला 'मोक्षा'कडे जाण्यास मी कसा बरे अडवू ? तूसुद्धा मी दिलेली वस्त्रे, सुवर्ण-रत्नालंकार आणि हे शरीर व चित्त यांचा त्याग करून निघून जा. मला तर हे पहिल्यापासूनच माहीत होते की, तुला 'मोक्षा'ची ओढ आहे. यासाठीच मी प्रत्यक्षात 'विवेक-पुत्राला' जन्म देण्याचा प्रयत्न केला नाही."

प्रभावती म्हणाली, "प्राणनाथ ! आपण अर्जुनाशी लढायला जात आहात; पण माझ्या हृदयात जो 'विवेक' नावाचा मुलगा आहे, त्याला मी

माझ्या डोळ्यांनी पाहू इच्छिते. माझी एवढीच इच्छा आहे की, आपण परलोकी गेल्यावर आपल्याला तिलांजली देणारा सुपुत्र असावा.''

सुधन्वा म्हणाला, ''श्रीकृष्ण आणि अर्जुनाला जिंकूनसुद्धा मी तुझ्याकडे येऊ शकतो !''

प्रभावती म्हणाली, ''नाही नाथ ! ज्याने एकदा श्रीकृष्णाचे दर्शन केले, तो संसारात कधीच परतून येत नाही.''

सुधन्वा म्हणाला, ''जर तुझा विश्वास आहे की, श्रीकृष्णाचे दर्शन झाल्यावर पुनरागमन होतच नाही, तर मग तू व्यर्थच तिलांजली देणाऱ्या पुत्राची इच्छा करतेस.''

प्रभावती म्हणाली, ''माझी इच्छा तर आपल्यालाच पूर्ण केली पाहिजे.''

सुधन्वा म्हणाला, ''कल्याणी ! तू कठोर शासनकर्त्या महाराजांना ओळखत नाहीस का ? थोडा जरी उशीर झाला, तर उकळत्या तेलाची कढई तयार असते. सगळे वीर निघून गेलेत. मीच एकटा उरलो आहे.''

अनेक प्रकारची प्रश्नोत्तरे झाली. शेवटी या धर्म-संकटात पतिव्रता प्रभावती विजयी झाली.

सुधन्वा परत स्नान-संध्या करून रथारूढ होऊन युद्धभूमीकडे निघाला.

× × × × ×

युद्धक्षेत्रात वीरांची दळेच्या दळे गोळा होऊ लागली. चोहीकडे रण-दुन्दुभी आणि शंखध्वनी होऊ लागले. चौघा राजकुमारांनी आणि सेना-नायकांनी महाराज हंसध्वजाला अभिवादन केले. परंतु वीरश्रेष्ठ राजकुमार सुधन्वा तोपर्यंत पोचला नाही. महाराज सेनापतीला म्हणाले, ''का बरे, सुधन्वा कसा दिसत नाही ? इतका मोठा प्रमाद त्याच्या हातून कसा घडला ? त्याला माझ्या कठोर आज्ञेचे विस्मरण झाले की काय ? हे त्याने फारच वाईट केले. आता काही सैनिकांना पाठवा आणि त्या

दुष्टाचे केस धरून फरफटत त्याला उकळत्या तेलाच्या कढईजवळ घेऊन या.''

कठोर राजाज्ञा पूर्ण करण्यासाठी काही शिपाई गेले. सुधन्वा त्यांना वाटेतच भेटला. अत्यंत दु:खी अंत:करणाने सुधन्व्याला राजाज्ञा ऐकवण्याचे कठीण कार्य त्यांना करावे लागले. सुधन्व्याने वडिलांजवळ जाऊन अत्यंत विनम्र भावनेने प्रणाम केला आणि विलंब व्हायचे कारण थोडक्यात सांगितले. राजा हंसध्वज क्रोधाने वेडे झाले होते. ते म्हणाले, ''तू महामूर्ख आहेस ! भगवान श्रीहरीच्या कृपेशिवाय केवळ पुत्र असला म्हणजे सद्गती मिळेल असे नाही. जर पुत्रवानांनाच सद्गती मिळणार असेल, तर कुत्रे आणि डुकरांना तर ती अवश्य मिळाली पाहिजे ! तुझ्या शौर्य, विचार आणि धर्मपालनाचा धिक्कार असो ! श्रीकृष्णाचे नाव ऐकूनसुद्धा तुझे मन कामासक्त झाले, अशा मलिनचित्त, काम-रत, कृष्णविन्मुख कुपुत्राला उकळत्या तेलात टाकून देणे हेच उचित होय !''

सुधन्व्याने मान खाली घातली.

राजाने पुरोहित शंख आणि लिखितकडे दूत पाठवून आता काय करावे, अशी विचारणा केली. पुरोहित महाराज मोठ्या तापट स्वभावाचे होते. दूतांकरवी राजाचा निरोप ऐकताच ते म्हणाले, ''राजा आपल्या पुत्र-मोहामुळे आता काय करावे, असे विचारतो आहे. जेव्हा सगळ्यांसाठी एकच नियम हे निश्चित आहे, मग आता काय करावे ही विचारणा का? जो मंदात्मा लोभ अथवा भयामुळे आपल्या वचनांचे पालन करीत नाही, त्याला मेल्यावर खूप काळ नरकात दारुण दु:ख सहन करावे लागते. राजा हरिश्चंद्र आणि दशरथ-कुमार रामचंद्राने वचनांचे पालन करण्यासाठी कसले कसले कष्ट सहन केले. आज राजा हंसध्वज, पुत्र-प्रेमामुळे जर आपल्या वचनाचे पालन करणार नसेल, तर अशा अधर्मी राजाच्या राज्यात आम्ही राहूच इच्छित नाही.'' असे म्हणून दोघे कट्टर ऋषी राज्य सोडून जाऊ लागले. दूतांनी राजाला जाऊन जे घडले ते सगळे सांगितले.

राजा हंसध्वजाने राजकुमार सुधन्व्याला उकळत्या तेलाच्या कढईत टाकायची मंत्र्याला आज्ञा दिली आणि स्वत: रागावून निघून जाणाऱ्या पुरोहितांना समजावण्यासाठी तो निघाला. मंत्र्यांना खूप वाईट वाटत होते, परंतु उपाय नव्हता. मंत्र्यांनी अनेक प्रकारे क्षमा–याचना करून सुधन्व्याला त्यांना मिळालेल्या आदेशाची कल्पना दिली. सुधन्वा धैर्याने म्हणाला की, ''मंत्रिवर ! तुम्ही महाराजांनी तुम्हांला दिलेल्या आदेशाचे अवश्य पालन केले पाहिजे. भगवान श्री परशुरामाने वडिलांची आज्ञा मानून आपल्या आईचे मस्तक कापले होते. मला माझ्या मृत्यूचे मुळीच भय वाटत नाही. तुम्ही नि:संकोचपणे मला उकळत्या तेलात टाकून द्या.'' सगळ्या लोकांनी मंत्र-मुग्ध होऊन सुधन्व्याचे बोलणे ऐकले. चोहीकडे लोकांच्या डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहू लागल्या. पण सुधन्वा प्रसन्नचित्त ! त्याने दिव्य-वस्त्रे परिधान केली. गळ्यात तुळशीची माळ घातली आणि भगवान वासुदेव श्रीकृष्णाचे स्मरण करीत तो श्रीकृष्णाला म्हणाला, ''हे हरे ! हे गोविंदा!! हे भक्त-भयभंजना!!! मला मरणाचे किंचित सुद्धा भय वाटत नाही. मी तर तुमच्या चरणी प्राणार्पण करण्यासाठीच आलो होतो. पण वाटेत आपला तिरस्कार करून मी कामदेवाची सेवा केली. म्हणूनच मला वाटते, मी आपल्या प्रत्यक्ष दर्शनापासून वंचित झालो. आणि त्यामुळेच हे प्रभो! बहुतेक आपण माझ्या रक्षणासाठी धावून येत नसाल! जे लोक केवळ भीतीने व्याकूळ होऊन, कष्टात पडल्यानंतरच आपला धावा करतात, त्यांना सुखाची प्राप्ती होत नाही, असे दिसते. भक्त प्रल्हाद, ध्रुव, द्रौपदी आणि गोपादींनी आधीच आपले खूप स्मरण केले होते, म्हणूनच संकटकाळी आपण त्यांच्या मदतीला धावून गेलात ! अंतकाळी आपले ध्यान केल्याने मनुष्याला आपली प्राप्ती होते. म्हणून हे जनार्दना ! मी आपल्याला प्राप्त तर निश्चितच करणार ! पण लोक हे नक्कीच म्हणणार की, वीर असूनसुद्धा सुधन्वा युद्धापासून विन्मुख झाला आणि कढईत जळून मेला. तुमचे भक्त वीर अर्जुन आणि तुम्हांला युद्ध-क्षेत्रात बाणवर्षावाने प्रसन्न करून गाण्डीव धनुष्यातून सुटलेल्या तीक्ष्ण

बाणांनी तुकडे-तुकडे होऊन मेलो असतो, तर काळजी नव्हती. पण आज अपराधी चोराप्रमाणे मरायचे आहे. म्हणून जर आपल्याला या बालकाचे असे मरणे अनुचित वाटत असेल, तर अग्निदाहापासून माझे रक्षण करून या शरीराला आपल्या पायी मरणाची संधी द्या ! मी तर तुमचाच आहे, तुमचाच राहीन ! तुम्ही सर्वसमर्थ आहात ! लज्जारूपी समुद्रात पडलेल्या द्रौपदीचा पितामह भीष्म आणि गुरु द्रोणाचार्यांसमोर तुम्ही वस्त्रावतार धारण करून उद्धार केलात." असे म्हणून सुधन्व्याने उकळत्या तेलात उडी टाकली.

प्रभूची लीला विचित्र आहे. एकदा प्रल्हादासाठी ईश्वराने अग्नीला शीतळ केले. एकदा इंद्रादी देवांचा दर्प चूर्ण करण्यासाठी दर्पहरण करणाऱ्या हरीने दावानलाच्या दाहक्षमतेचे हरण केले. आज भक्त सुधन्व्याला वाचवण्यासाठीसुद्धा तेल असे शीतळ झाले, जसे सज्जनाचे चित्त ! **'तैलं सुशीतलं जातं सज्जनस्येव मानसम्'** सुधन्वा प्रेमाने, 'गोविंद, माधव, दामोदर' इत्यादी भगवंताच्या पवित्र नामांचे संकीर्तन आपल्या शरीराची शुद्धी विसरून करीत होता. कढई त्याच्यासाठी प्रेम-समाधी बनली. उकळत्या तेलात पडूनसुद्धा सुधन्वा जळत नाही आणि तो तेलावर वर-वर तरंगतोय हे पाहून लोकांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. राजा हंसध्वज पण तोपर्यंत दोन्ही पुरोहितांना घेऊन तिथे पोचला. राजाला मोठा विस्मय वाटला.

ईश्वराची भक्ती आणि श्रद्धारहित केवळ तर्क आणि बुद्धीचा अभिमान धरणाऱ्या घमेंडखोर पुरोहित शंखाने सुधन्व्यावर संशय व्यक्त केला आणि तो राजाला म्हणाला, "राजा ! हे असे कसे ? तेल उकळले नाही की, तुझ्या मुलाला एखादा औषधी-मंत्र माहीत आहे ? त्याचा चेहरा प्रफुल्लित कमळाप्रमाणे कांतियुक्त होऊन तेजःपुंज दिसतो आहे. याच्या अंगावर कुठे एक फोडसुद्धा दिसत नाही. यात काही तरी चलाखी दिसते. जर तेल खरोखर गरम असते, तर असे झालेच नसते. गरम तेलाने माणूस होरपळून

निघत नाही, हे निसर्गनियमाच्या विरुद्ध आहे.'' आता काय म्हणावे या धर्मशास्त्रसंपन्न ब्राह्मणांना ! यांना अद्याप लक्षात येत नाही की, ईश्वर निसर्गाचा स्वामी आहे, त्याच्या इच्छेने, नव्हे, त्याच्या संकल्पमात्रेकरून अशक्य गोष्टी शक्य होतात !

**मसकहिं करइ बिरंचि प्रभु अजहि मसक ते हीन**

''ईश्वराच्या मनात आले, तर तो डासाला ब्रह्मा आणि ब्रह्म्याला डासापेक्षा लहान बनवू शकतो.''

तरी शंखाच्या मनातली शंका संपेना ! त्यांनी गरम तेलाची परीक्षा घेण्यासाठी त्यात सोललेला नारळ टाकायला सांगितले. उकळत्या तेलात नारळ पडताच तो ताडकन फुटला आणि त्याचे दोन तुकडे होऊन ते उसळले आणि शंख आणि लिखित या दोघांच्या डोक्यावर आदळले. ऋषी घाबरून गेले. आता त्यांचे डोळे उघडले. ईश्वर आणि त्यांच्या भक्ताचे माहात्म्य त्यांच्या लक्षात आले.

मुनिवर शंखांनी सेवकांना विचारले की, उकळत्या तेलात टाकूनसुद्धा सुधन्व्याला काहीच कसे झाले नाही ? त्याने एखाद्या मंत्राचा जप केला की, कमरेत एकादी वनस्पती बांधली, त्यामुळे त्याच्या शरीरावर तेलाच्या झळांचा परिणाम झाला नाही ? सेवक नम्रपणे म्हणाले, ''मुनिवर ! आम्ही तर राजकुमाराला एखाद्या मंत्राचा जप करताना किंवा शरीरावर कुठे औषधी बांधताना पाहिले नाही. हे खरे, राजकुमाराने आर्त भावनेने महामती श्रीकृष्णाचा धावा उत्कटपणे केला होता, ज्याच्या स्मरणमात्राने जीव जन्म-मृत्यूच्या संकटातून मुक्त होतो. **यस्य स्मरणमात्रेण मुच्यते योनिसंकटात्।** अजून सुद्धा सुधन्व्याचे हलणारे ओठ पाहा ते कसे भगवान श्रीकृष्णाच्या नावाचे सतत स्मरण करीत आहेत. हे ऐकून शंख मुनींनी स्वत:चा धिक्कार केला आणि म्हणाले, ''हा धन्य आहे ! हा महान साधू आहे ! कारण याचे भगवान विष्णूच्या चरणी मन इतके लीन झाले आहे. आमच्यासारख्या पांडित्याचा अहंकार मिरवणाऱ्यांचा धिक्कार

असो ! जे पांडित्याच्या अभिमानात भगवंतापासून विन्मुख झालेले आहेत.'' याचप्रकारे एकदा वृन्दावनात यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांनी आपल्या पत्नींच्या अतुल श्रीकृष्णप्रेमाने प्रभावित होऊन स्वतःचा धिक्कार केला होता -

**धिग् जन्म नस्त्रिवृद्विद्यां धिग् व्रतं धिग् बहुज्ञताम्।**
**धिक् कुलं धिक् क्रियादाक्ष्यं विमुखा ये त्वधोक्षजे॥**
**नूनं भगवतो माया योगिनामपि मोहिनी।**
**यद् वयं गुरवो नृणां स्वार्थे मुह्यामहे द्विजाः॥**
**अहो पश्यत नारीणामपि कृष्णे जगद्गुरौ।**
**दुरन्तभावं योऽविध्यन्मृत्युपाशान् गृहाभिधान्॥**
**नासां द्विजातिसंस्कारो न निवासो गुरावपि।**
**न तपो नात्ममीमांसा न शौचं न क्रियाः शुभाः॥**
**अथापि ह्युत्तमश्लोके कृष्णे योगेश्वरेश्वरे।**
**भक्तिर्दृढा न चास्माकं संस्कारादिमतामपि॥**

(श्रीमद्भा० १०/२३/३९-४३)

''भगवंतापासून विमुख झालेल्या आम्हा ब्राह्मणांच्या तिन्ही जन्मांना (एक गर्भातून, दुसरा उपनयनातून, तिसरा यज्ञदीक्षेतून), ब्रह्मचर्यव्रताला, मोठ्या शहाणपणावर, उत्तम कुळाला आणि यज्ञकर्मातील आमच्या निपुणतेला पुनः पुनः धिक्कार असो ! यात संशय नाही की, ईश्वराची माया योग्यांनासुद्धा मोहित करते. हाय ! लोकांना उपदेश देणारे आम्ही गुरुजन असूनसुद्धा आज आम्ही आमच्या खऱ्या स्वार्थाला नीट ओळखू शकलो नाही. अहाहा ! या स्त्रियांत जगद्गुरू भगवान श्रीकृष्णांविषयी किती अनन्य भक्ती आहे ! त्यामुळे यांनी घराची सगळी ममता, कठिण मृत्यु-पाश क्षणात तोडून टाकला आहे. या स्त्रियांवर कुणी आमच्याप्रमाणे यज्ञोपवीताचा संस्कार केला नाही, यांनी गुरुगृही राहून शिक्षणही प्राप्त केले नाही, तपही केले नाही आणि आत्मज्ञानाची मीमांसाही केली नाही. यांच्यात शुचिता नाही आणि या यज्ञादी शुभकर्मेही करीत नाहीत. तरीपण

या योगेश्वरांचे ईश्वर अशा पवित्रकीर्ती भगवान श्रीकृष्णाची दृढ भावनेने भक्ती करतात. आमच्यावर सगळे संस्कार झालेले आहेत आणि आमच्यांत विद्या, तप, विवेक, शुचिता आणि यज्ञादी क्रियांचे कर्म ही आहेत; पण खेदाची गोष्ट अशी की, आमच्यात खरीखुरी ईश्वराची भक्ती नाही.''

ही गोष्ट खरीच आहे की, थोर आणि बुद्धिवान तोच आहे जो ईश्वराच्या चरण-कमलांचे नित्य चिंतन करतो आणि त्यांना शरण जातो. भक्तराज प्रल्हादाने म्हटले आहे की, बारा प्रकारच्या सद्‌गुणांनी सम्पन्न असा ब्राह्मण असला, तरी जर तो कमलनाभ विष्णूच्या चरण-कमलापासून विन्मुख असेल, तर त्याच्यापेक्षा तो चांडाळ श्रेष्ठ आहे, ज्याने आपले तन-मन-धन, वचन-कर्म आणि प्राणांना ईश्वरचरणी समर्पित करून टाकले आहे. तो भगवद्‌भक्त चांडाळ आपल्या सगळ्या कुलाला पवित्र करू शकतो, पण तो अत्यंत सन्मान-प्राप्त ब्राह्मण स्वत:लाही पवित्र करू शकत नाही. (श्रीमद्भा० ७/९/९)

शंख मुनींना आपल्या वागण्याचा मोठा पश्चात्ताप वाटू लागला आणि ते म्हणू लागले, ''आता मीच या तप्त तेलाच्या कढईत उडी घेऊन मरणांत प्रायश्चित्त घेणार !'' **प्रायश्चित्तं स्वदेहस्य करिष्ये मरणान्तकम्।** असे म्हणून त्यांनी कढईत उडी मारली. पण भक्त सुधन्व्याच्या शुभ भावनेमुळे तेल त्यांच्यासाठी पण शीतल झाले. मुनींनी सुधन्व्याला छातीशी धरले आणि गद्‌गद् स्वरात म्हणाले, ''प्रिय कुमार! तू महान साधुश्रेष्ठ क्षत्रियवीर आहेस ! तू धन्य आहेस ! मी तर असा ब्राह्मण आहे, ज्याला साधू म्हणता येणार नाही. तुझ्यासारख्या भक्ताला उकळत्या तेलात टाका सांगणारा मी तर मूर्ख ब्राह्मण आहे. माझ्या लक्षात आले की, जे भगवान श्रीकृष्णाचे नित्य स्मरण करीत नाहीत, अशा मूढ व्यक्तींनाच सतत संताप, अभाव आणि दु:खे सहन करावी लागतात. जे भाग्यवान पुरुष सर्व कार्यांत फल देणाऱ्या भगवान गोविंदाचे स्मरण करतात, ते ताप-त्रयांतून मुक्त होऊन सुखी होतात.''

**ये स्मरन्ति च गोविन्दं सर्वकामफलप्रदम्।**
**तापत्रयविनिर्मुक्ता जायन्ते दु:खवर्जिता:॥**

अग्नीत इतकी शक्ती कोठे आहे की, जी तुझ्यासारख्या परम वैष्णवाला जाळू शकेल ? ज्या सुरासुरगुरू भगवान श्रीकृष्णाचे दर्शन मुनिजनांना दुर्लभ आहे, ज्यांनी एके दिवशी अग्नि-ज्वालातून भक्त प्रल्हादाचे रक्षण केले होते, तू प्राणान्त समयी मन-वाणीने त्यांचेच स्मरण करीत राहिलास. पुरुषसिंहा ! तुझ्या शरीराचा स्पर्श प्राप्त करून आज माझे हे अधम शरीर पण पवित्र झाले. पवित्र होण्याचा याच्यापेक्षा श्रेष्ठ अन्य कोणताही उपाय नाही. तीर्थाला तीर्थत्व भक्तांच्यामुळेच प्राप्त होते. महाराज युधिष्ठिरांनी विदुरास म्हटले की,

**भवद्विधा भागवतास्तीर्थभूता: स्वयं विभो।**
**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्त:स्थेन गदाभृता॥**

(श्रीमद्भा० १/१३/१०)

''हे प्रभो ! आपल्यासारखे भगवद्भक्त स्वत:च तीर्थरूप असतात! पाप्यांनी कलुषित केलेल्या तीर्थांना आपल्यासारख्या भक्तांमुळेच परत तीर्थत्वाची प्राप्ती होते. कारण आपल्या हृदयात भगवान गदाधर नित्य वसतीला असतात.'' म्हटले आहे की,

**अक्ष्णो: फलं त्वादृशदर्शनं हि**
**तन्वा: फलं त्वादृशगात्रसङ्ग:।**
**जिह्वाफलं त्वादृशकीर्तनं हि**
**सुदुर्लभा भागवता हि लोके॥**

''आपल्यासारख्या भक्तांच्या दर्शनाने नेत्र सफळ होतात ! आपल्यासारख्या भक्तांच्या अंगस्पर्शाने शरीर सफळ होते आणि आपल्या-सारख्या भक्तांच्या गुण-गानानेच वाणी सफळ होते. कारण जगात भक्त अत्यंत दुर्लभ आहेत.

राजानं राजपुत्रांश्च सैन्यं पावय सुव्रत।
उत्तिष्ठ वत्स तैलात्त्वं मां समुद्धर भूपज॥
कृष्णोऽयं पाण्डवस्याथ सारथ्यं प्रकरोति च।
अर्जुनेनाद्य संग्रामं कुरु वीर यथोचितम्॥

''हे पवित्र राजकुमारा! हे वत्सा! उठून उभा राहा. तेलाच्या बाहेर येऊन आपले पिता, थोरले चौघे बंधू आणि सर्व सैन्याला पावन कर. त्यांच्याबरोबर माझाही उद्धार कर. हे वीरा! भगवान श्रीकृष्ण ज्या आपल्या भक्त अर्जुनाच्या रथाचे सारथ्य करतात, त्या अर्जुनाबरोबर रणांगणात यथायोग्य युद्ध कर.''

मुनींच्याबरोबर सुधन्वा तेलाच्या कढईतून बाहेर येऊन आपल्या पित्याजवळ गेला. मुनीने सुधन्व्याच्या भक्ति-भावनेची आणि तिच्या अमित प्रभावाची राजासमोर खूप प्रशंसा केली. राजाने आपल्या पुत्राला हृदयाशी कवटाळले आणि गद्‌गद स्वरात 'कल्याण होओ' असा आशीर्वाद देऊन युद्धात अनुपम अतिथी अर्जुनाचा यथोचित सत्कार करण्याचा आदेश दिला.

पित्याची आज्ञा घेऊन सुधन्वा सुंदर रथावर आरूढ होऊन त्वरित युद्धस्थलावर उपस्थित झाला. दोन्ही बाजूला वेग-वेगळ्या प्रकारची वाद्ये वाजू लागली. शंखांचा तुमुल नाद होऊ लागला. वाद्ये आणि रथ, घोडे आणि हत्ती यांच्या गर्जनेने पृथ्वी कापू लागली. भीषण युद्धाला प्रारंभ झाला. पांडवांच्या बाजूला महावीर अर्जुनाच्या नेतृत्वाखाली अपार सैन्याबरोबर श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न, कर्णपुत्र वृषकेतू, कृतवर्मा, सात्यकी, अनुशाल्व इत्यादी प्रसिद्ध योद्धे होते. इकडे सुधन्व्याच्या नेतृत्वाखाली राजा हंसध्वजाची विपुल सेना सज्ज होती. श्रीकृष्णभक्त वीर क्षत्रियकुमार सुधन्वा याने क्रमाक्रमाने वृषकेतू, प्रद्युम्न, कृतवर्मा, सात्यकी आणि अनुशाल्व यांचा पराभव केला. महासंग्रामाच्या अंती सगळ्यांना हार पत्करून किंवा जखमी होऊन युद्ध भूमीतून निघून जाणे भाग पडले. शेवटी अर्जुन स्वत: समोर

आला. दोन्ही बाजूला भगवंताचे अनन्य भक्त आणि अजेय योद्धा ! फरक इतकाच की, अर्जुनाला मोठ-मोठ्या युद्धांचा भरपूर अनुभव होता, तर सुधन्वा अद्याप नवा पण युद्धात तरबेज असा वीर होता. अर्जुनाला आपल्या भक्तीचा आणि शौर्याचा अभिमान होता; तर सुधन्वा पूर्णपणे ईश्वरावर विश्वास ठेवून होता. या युद्धातून भगवंत आज हे दाखवू इच्छित होते की, भक्ती किंवा शौर्य कुणाची मक्तेदारी नाही. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे हे दाखवायचे आहे की, भगवान श्रीकृष्णाचे साहाय्य आणि सोबत नसल्यावर अर्जुनासारखा महारथीपण एका बालकाकडून युद्धात पराभूत होतो.

अर्जुनाने सुधन्वा समोर आल्याबरोबर त्याला म्हटले की, ''वीर युवका! मी मोठमोठाली युद्धे जिंकली आहेत. महावीर गुरू द्रोण, पितामह भीष्म, कुलगुरू कृपाचार्य आणि महात्मा कर्णाबरोबरपण मी युद्ध केले आहे. भगवान शंकर आणि मोठमोठ्या दैत्यांबरोबरसुद्धा युद्धात मी यशस्वी झुंज दिली आहे. पण तुझ्यासारखा रणशूर मला कुठेच भेटला नाही. तुला पाहून मला जितके आश्चर्य वाटले तितके यापूर्वी कधीच वाटले नाही.'' **तथा न विस्मयो जातो यथा त्वां वीक्ष्य जायते ?**

सुधन्वा म्हणाला, ''वीरवर ! आधीच्या युद्धात तुमचे परम हितकारी भगवान श्रीकृष्ण मोठ्या सावधपणे रथात बसून तुमचे सारथ्य करीत होते. आज तुम्ही श्रीकृष्णविहीन आहात; म्हणूनच तुम्हांला आश्चर्य वाटते आहे. तुम्ही श्रीकृष्णाचा त्याग कसा काय केलात ? असे तर नाही ना की, माझ्या-बरोबर युद्ध करण्याकरिता श्रीकृष्णाने तुम्हांला एकटे सोडून दिले आहे ? सांगा, माझ्याशी युद्ध करायला तुम्ही समर्थ आहात की नाही ?'' सुधन्व्याचे बोलणे ऐकून अर्जुनाने क्रोधित होऊन त्याच्यावर बाणांचा वर्षाव करायला सुरवात केली. सुधन्व्याने हसतखेळत पाहता पाहता अर्जुनाच्या सर्व दिव्य बाणांचे तुकडे करून टाकले. **'सुधन्वा ताञ्छरान् दिव्यांश्चिच्छेद प्रहसन्निव।'**

मोठे भयानक युद्ध झाले ! अर्जुनाने आपले सारे कौशल्य पणाला लावले. परंतु सुधन्व्यापुढे त्याची मात्रा चालेना ! वीर भक्त बालक सुधन्व्याचे युद्धनैपुण्य आणि अनवरत बाणांचा वर्षाव पाहून अर्जुन घाबरला. त्याचा सारथी जखमी होऊन खाली पडला. हे पाहून सुधन्वा हसत हसत म्हणाला की,

**शरैः क्षतोऽसि पार्थ त्वं पौरुषं क्व गतं च ते।**
**सर्वज्ञं सारथिं त्यक्त्वा प्राकृतः सारथिः कृतः॥**
**स्मर स्वसूतं कृष्णाख्यं ममाग्रे पतितो ह्यसि॥**

''हे पार्था ! तुम्ही आज माझ्या बाणांनी घायाळ झालात. आज तुमचा पुरुषार्थ कुठे गेला ? वीरवर ! आज तुम्ही आपल्या नेहमीच्या सर्वज्ञ सारथ्याला सोडून त्याऐवजी साधारण सारथ्याला नेमून मोठीच घोडचूक केलीत. तुम्ही माझ्यासमोर युद्धात खाली पडलात, म्हणून आता त्वरित आपल्या श्रीकृष्ण नावाच्या सारथ्याचे स्मरण करा !''

अर्जुन डाव्या हाताने धनुष्यासहित घोड्यांचा लगाम पकडून युद्ध करू लागला आणि मनातल्या मनात आपल्या जीवनाचा आधार जो श्रीकृष्ण ते म्हणाले, 'बंधो ! घोड्यांचे लगाम सोड'.

**मुञ्च चाश्वानर्जुनेति व्याजहार वचो हरिः।**

भगवान वासुदेव आले, हे पाहताच अर्जुन आणि सुधन्वा दोघांनी त्यांना हात जोडून प्रणाम केला. अर्जुनाला हर्ष होणे स्वाभाविकच होते; परंतु सुधन्व्याच्या हर्षाचा दुसराच प्रकार दिसतो. ज्या कार्यासाठी माता-पित्याची आज्ञा आणि प्रिय पत्नीबरोबर परामर्श करून रणक्षेत्रात अर्जुनाला हैराण केले, ते शुभकार्य आता कुठे संपन्न झाले. भगवंताची दिव्यरूपमाधुरी आणि त्यांची अतुलनीय भक्तवत्सलता पाहून सुधन्वा कृतार्थ झाला. सुधन्व्याने मनातल्या मनात पुनः पुनः भगवान श्रीकृष्णाला प्रणाम केला आणि भगवंताच्या प्रेरणेनुसार प्रकटपणे तो म्हणाला,

**दृष्टस्त्वमसि गोविन्द पाण्डवार्थे समागतः।**
**सर्वगत्वं मया ज्ञातं त्वदीयं किल केशव॥**

"हे गोविंदा ! आपण अर्जुनासाठी आलात तरी आपले दर्शन मला घडले. हे केशवा ! मला आपल्या सर्वव्यापकतेची अनुभूती प्राप्त झाली." खुणेने भगवंतांना गूढ शब्दांत इतकेच बोलून हसत हसत सुधन्वा अर्जुनाला म्हणाला, "पार्था, तुझे सारथी श्रीकृष्ण आता आले आहेत; आता तरी मला जिंकण्यासाठी एखादी प्रतिज्ञा कर." या शब्दांनी सुधन्व्याने जणू हे सूचित केले की, श्रीकृष्ण केवळ तुझेच सारथी नाहीत. माझे पण प्राणसर्वस्व आहेत. तुझ्या प्रतिज्ञापूर्तीसाठी आपले पुण्य देऊन तुझे ते रक्षण करतील; तर माझ्या प्रतिज्ञेचे रक्षण केवळ संकल्पमात्रे करून टाकतील. आज जगाला भगवंताची ही अशी लीला पण पाहावयास मिळेल.

सुधन्व्याचे आह्वान ऐकून अर्जुनाने तीन बाण काढून प्रतिज्ञेची घोषणा करीत म्हटले, "या तीन बाणांनी मी तुझ्या सुंदर मस्तकाला जमिनीवर पाडीन. जर असे मी करू शकलो नाही, तर माझे पूर्वज पुण्यहीन होऊन नरकात पडोत ! माझे हे वचन सत्य आहे. यात कणमात्र असत्य नाही."

अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून मरणोन्मत्त भक्तवर वीर सुधन्व्याने सुद्धा हात उंचावून घोषणा केली की, "श्रीकृष्णासमोरच मी तुमच्या तिन्ही बाणांचे तुकडे तुकडे करून टाकीन. जर मी असे करू शकलो नाही, तर मला घोर नरकाची प्राप्ती होओ !"

दोन्ही बाजूंनी परस्परविरोधी प्रतिज्ञांची घोषणा झाली. दोघेही महावीर आणि भगवंताचे अनन्य भक्त आहेत. दोन्ही बाजूच्या सेना, सगळे वीर सगळ्या देवता व ऋषिगण हे अद्‌भुत आश्चर्य पाहण्यासाठी उत्कंठित झाले.

सुधन्व्याने बाणांचा पाऊस पाडला आणि श्रीकृष्णासह अर्जुनाला घायाळ करून रथाची मोडतोड केली आणि रथाला तो चक्राप्रमाणे घुमवू

लागला. त्यानंतर दहा बाणांनी अर्जुनाला आच्छादित करून असा एक बाण मारला की, अर्जुनाचा रथ चारशे हात मागे गेला. हे पाहून भगवंत अर्जुनाला म्हणाले, ''बंधो ! पाहिलास सुधन्व्याचा पुरुषार्थ ? कसा वीर योद्धा आहे ! मला न विचारताच तू अशी कठीण प्रतिज्ञा करायला नको होतीस. ही चांगली गोष्ट झाली नाही. जयद्रथ-वधाच्यावेळी किती त्रास झाला होता ? तू ते विसरून गेलास का ? ज्या वीराने तुझ्या पायाच्या बळाने दबलेल्या रथाला एका बाणानेच चारशे हात मागे ढकलून दिले, त्याच्याशी युद्धात तू कसा काय जिंकणार ? मला तर वाटते, हे सुधन्व्याच्या 'एकपत्नीव्रता' चे बळ आहे. या एकपत्नी व्रतात मी आणि तू, आपण दोघेही फारच मागे आहोत. अशा स्थितीत महान कष्ट होणार हे निश्चित आहे.''

अर्जुन म्हणाला, ''गोविंदा ! जर आपले शुभागमन झाले आहे, मग मला भीती कसली ? मी निश्चितच या तीन बाणांनी सुधन्व्याला रणांगणात खाली पाडीन. आता मला महाकष्ट होतील याची सुतराम शक्यता नाही. आपल्या हातात जिथे माझ्या जीवन-रथाचा लगाम आहे, तिथे माझे अनिष्ट कोण आणि कसे करू शकेल ?''

अर्जुनाने पहिला बाण हातात घेतला, तेव्हा सुधन्वा ओरडून कृष्णाला म्हणाला, ''गोविंदा ! ज्या प्रकारे गोकुळात गायींच्या रक्षणासाठी आपण गोवर्धन पर्वत आपल्या हातावर उचलून धरला होता, त्याचप्रकारे आज तुमचा भक्त अर्जुन याचे रक्षण करा ! परंतु लक्षात ठेवा की, मी पण आपला दासानुदास आहे.'' भगवंतांनी भक्त सुधन्व्याची कीर्तिपताका चिरकाल स्थायीरूपाने फडकत राहावी म्हणून आणि भक्त अर्जुनाचे रक्षण व्हावे म्हणून आपल्या गोवर्धन धारण करण्याचे पुण्य बाणाबरोबर जोडले. कालाग्नीप्रमाणे अर्जुनाचा बाण निघाला; परंतु पुण्यात्मा भक्तवर सुधन्व्याने एका क्षणात त्याला मध्येच कापून टाकले. राजा हंसध्वज आपल्या सैनिकांसमवेत प्रसन्न झाले. भगवंताने सुधन्व्याच्या बल-पौरुषाची

आणि प्राण-रक्षणार्थ केलेल्या पराक्रमाची प्रशंसा केली आणि अर्जुनाला दुसरा बाण संधान करून सोडण्याची आज्ञा दिली. या बाणासोबत पण श्रीकृष्णाने आपले खूप पुण्य जोडले. सुधन्वा म्हणाला, ''गोविंदा ! तुमची लीला अगाध आहे ! पण लक्षात असू द्या की, तुमच्या या भक्ताला तुमच्या लीला अपरिचित नाहीत.'' मग तो अर्जुनाला म्हणाला, ''पार्था ! भगवान श्रीकृष्णाचे स्मरण करून बाण सोडा!'' अर्जुनाचा प्रलयंकारी बाण निघाला; परंतु वीर सुधन्व्याने आपल्या प्रबळ पुरुषार्थाने तेही मध्येच कापून टाकले. दुसऱ्या बाणाचेही तुकडे होताच अर्जुन थोडा उदास झाला आणि रणांगणावर हाहाकार माजला. चोहीकडे सुधन्व्याच्या शौर्याची प्रशंसा होऊ लागली. त्यानंतर भगवंतांनी अर्जुनाला तिसरा बाण संधान लावून सोडण्याची आज्ञा दिली. या वेळेस आपल्या रामावताराचे संपूर्ण पुण्य त्यांनी बाणासोबत जोडले. बाणाच्या मागच्या बाजूला प्रजापिता ब्रह्मा, मध्ये काल यांना जोडून बाणाच्या अग्रभागावर स्वत: भगवंत आरूढ झाले. सुधन्वा म्हणाला, ''भगवंता ! माझा वध करण्यासाठी बाणाच्या अग्रभागावर आपण स्थित झालात, हे माझ्या लक्षात आले आहे. हे नाथ! मला युद्ध भूमीत आपल्या चरणी आश्रय देऊन कृतार्थ करा ! माझी हीच तर इच्छा होती. याच्यापेक्षा माझे मोठे भाग्य काय असू शकते ? अर्जुना ! तू धन्य आहेस. कारण साक्षात नारायण तुझ्यासाठी आपले पुण्य समर्पित करतात. इतकेच नव्हे तर स्वत: बाणात स्थित होतात ! तुझे निश्चितच कल्याण होणार! पण सावधान! श्रीकृष्णाच्या आपल्या या बाणाचे पण अवश्य तुकडे करून टाकीन!''अर्जुनाने बाण सोडला. परंतु सुधन्व्याने श्रीकृष्णाचा जय- घोष करीत याही बाणाचे तुकडे तुकडे केले. सुधन्व्याने कापलेल्या बाणाचा अर्धा भाग पृथ्वीवर पडला. या बाणाचे तुकडे होताच संपूर्ण चंद्रमंडळ कापू लागले. भक्त सुधन्व्याच्या प्राणांचे रक्षण झाले. आता अर्जुनाच्या प्राणांचेही रक्षण झाले पाहिजे, म्हणून बाणाचा अर्धा भाग भगवत्प्रेरणेने वर उचलला

गेला आणि त्याने सुधन्व्याचे प्रकाशमान कुंडले धारण केलेले, पुरुषार्थाचे भांडार असे सुंदर मस्तक धडापासून वेगळे केले.

सुधन्व्याच्या मस्तकहीन कबंधाने पांडवांच्या सैन्याला 'दे माय धरणी ठाय', असे करून सोडले आणि त्याचे भाग्यवान मस्तक आनंदाने केशव, राम, नृसिंह आणि भगवन्नामाचा गजर करीत श्रीकृष्णाच्या जगत्पावन चरणकमलांवर जाऊन पडले.

भगवंतानी आपल्या चरणी पडलेल्या त्या सुंदर मुखाला प्रेमाने आपल्या दोन्ही हातांनी उचलले. तेवढयात वीर बालक सुधन्व्याच्या मुखातून एक तेजस्वी ज्योत निघाली आणि सगळ्यांच्या समोर पाहता पाहता ती चटकन श्रीकृष्णाच्या मुखात प्रविष्ट झाली. या गोष्टीचे रहस्य श्रीकृष्णाशिवाय कुणाच्याच लक्षात आले नाही.

**सुधन्वनोऽतिसत्त्वस्य कृष्णो जानाति नेतरः ।**

बोला भगवंत आणि भगवंताच्या प्रिय भक्तांचा विजय असो !

❑❑